# त्राटिका.



## अंक पहिला.

### प्रवेश १—कुसुमपुरांतील एक रस्ता.

रंभाजीराव व येसाजी बोलत येतात.

**येसाजी**—राव, घालूं [illegible] हें डोक्यांतलें वेड; आपले हेतु सरळ मार्गानें साधण्यासारखे आहेत, मग [illegible] आडरानांत कां शिरतां?

**रंभाजी०**—बस्स, बोलो, पुरें कर हें तुझें [illegible]. तूं ह्मणतोस तो मार्ग भावलाभावलीचा [illegible] मला तो बिलकुल पसंत नाहीं.

**येसाजी**—आपल्यापुढें मीं काय बोलावें! आपण चांगले शिकलेसवरलेले, इतिहास, पुराणें आपण पढलां, शास्त्राध्ययन केलें, ज्ञान मिळवून मनाचा संकुचितपणा काढून टाकला; तेव्हां आपल्याला मी काय शिकविणार? तथापि गरिबीमुळें या जगांतील खऱ्या अनुभवाचा फायदा मला जो मिळाला आहे तो आपल्याला नाहीं; तेव्हां माझ्या बोलण्याचा नीट विचार करा अशी मी आपल्याला पुनः विनंति करतों.

**रंभाजी०**—अरे, तूं ह्मणतोस त्याप्रमाणें विद्येनें माझें मन विकास पावलें आहे ह्मणूनच माझ्या मनांत असे विचार येतात. ज्यांना विद्येचा गंधही नाहीं अशांना धोपट मार्गावांचून दुसरें काय दिसणार? तुला अनुभव जास्त आहे खरा; पण जो मार्ग जगांत, [illegible] आमच्या या देशांत तरी, क्वचितच पाहण्यांत येतो, त्या[illegible] तुला काय माहिती? हें पहा, मी तुला एकच सांगतों. आई-

बापांच्या नांवावर विकून, मेल्याप्रमाणें केवळ आयतोबा होऊन राहणारा मी नाहीं. त्यांतून लग्नाची गोष्ट कांहीं वेगळी आहे. ज्यायोगें जन्माच्या गांठी पडावयाच्या अशा कामीं आपली आपण पारख न करतां वडिलांवर सारी भिस्त टाकणें मला तर प्रशस्त वाटत नाहीं. मी कांहीं आतां लहान नाहीं. माझें हिताहित मला चांगलें समजतें.

**येसाजी**-राव, आतां बोललों तर राग येईल. आजपर्यंत वडिलांनींच मुलांचीं लग्नें केलीं आहेतना ? मग त्यांपासून वाईट झाल्याचें कोठें दिसत नाहीं ? चांगला संसार करून लोक राहत असलेले आपण पहात नाहीं का ? चारचौघे ज्या मार्गानें गेले असा खात्रीचा सुखाचा मार्ग सोडून ज्याची माहिती नाहीं अशा रस्त्यानें जाणें आणि अनुभवशून्य तारुण्याला आपला वाटाड्या करणें ह्मणजे—

**रंभाजी०**-बस्स. वादविवाद करून हा तंटा कांहीं मिटावयाचा नाहीं. ज्याची त्यानें निवड करून लग्न केल्यास संसार अधिक सुखावह होईल किंवा नाहीं याचा अनुभवावांचून निकाल कसा लागणार ? मी हा अनुभव घेऊन पाहणार; मग त्यापासून परिणाम काय होईल तो होवो.

**येसाजी**-आपला निश्चय झाल्यासारखा दिसतो आणि लहानपणापासून आपल्या हट्टी स्वभावाचा मला अनुभव आहे. तेव्हां उलटपक्षीं मीं कांहीं सांगितलें तरी तें आपल्याला रुचणार नाहींच; तथापि मी ह्मणतों, कीं आपल्या या कृतीनें आपल्या वृद्ध व सन्माननीय वडिलांस काय वाटेल याचा विचार करा.

**रंभाजी०**-अरे, त्याचा मीं विचार केला आहे. आपली परवानगी न घेतल्याबद्दल आरंभीं त्यांना थोडासा राग येईल. पण ते समजूतदार आहेत. स्थल चांगलें, अब्रूदार व श्रीमंत आहे, व सून स्वरूपवान असून सुशील आहे असें पाहिल्यावर ते क्षमा केल्याशिवाय राहणार नाहींत. हें पहा, तूं आतां जास्त आढेवेढे घेऊ नकोस. तूं माझा जिवाचा स्नेही. या परक्या ठिकाणीं तुझ्यावांचून माझें साहाय्य दुसरें कोण करणार आहे बरें ? माझें मन या

लग्न झाल्याशिवाय धाकटीचें लग्न मला कर्तव्य नाहीं. आतां तुह्मांला या माझ्या लाडक्या आनंदीशीं–

**त्राटिका**–हां बाबा ! मीं तुह्मांला हजारदां सांगितलें आहे, कीं मला तें मिळमिळीत नांव आवडत नाहीं ह्मणून. तरी मेली आपली तुमची खोड कांहीं जात नाहीं. आणखी मला लाडकीबिडकी म्हणूं नका. ही पहा तुमची लाडकी छबकडी बरें का ! ( **कमळे**च्या बरगडींत बोटें खुपसते. )

**धनाजी**०–राहिलें. हिच्याशीं लग्न करावयाला जर तुह्मांपैकीं कोणी तयार असेल तर बोला. मात्र तिला तुह्मी अनुकूळ करून घेतली पाहिजे. तिची मनधरणी तुह्मी पाहिजे त्या मार्गानें करा. मी तुह्मांला मोठ्या आनंदानें परवानगी देतों.

**रणधीर**०–( **राणोजीरावास** एकीकडे ) कां राणोजीराव, आहे का हें रत्न आपल्याला पसंत ? पहा बोवा ! खंबीर बायको आहे. हिच्याशीं लग्न लागलें ह्मणजे मग तुह्मांला कशाची काळजी नको.

**राणोजी**०–( **रणधीररावास** एकीकडे ) तर मग राव, अस्मादिकानींच ती घ्यावी; वस्तुतः म्हणतों अस्मादिकांचाच हक्क तिच्यावर आहे. आह्मां दोघांत अस्मादिक वडील, त्या दोघींत ती तीर्थरूप तव्हां तुह्मां दोघांचें वैधव्य व्हावें हेंच रास्त.

**रणधीर**०–( त्याला एकीकडे ) वाः, आपल्या बोलण्याचा अर्थ करावयाला बृहस्पतीच खालीं आले पाहिजेत. हा अस्मादिक शब्द कोठें शिकलांत आपण ? बरें तें असो. हिच्याशीं लग्न लावण्यांत रास्तगैरगस्त काय घेऊन बसलां आहां ? हें पहा, तुम्ही आहां तरणेज्वान, तुह्मांला कदाचित हें प्रकरण झेंपेल.

**त्राटिका**–काय मेल्या भित्र्या भागूबाई आहेत पहा ! कशा कुजबुजताहेत आपापसांत ! का, बाबा, असल्यांशीं बांटतें माझी जन्माची गांठ घालून देणार ? मी तुम्हांला साफ सांगतें मला मुळींच लग्न करावयाचें नाहीं. लग्न करून घेऊन नवऱ्याची बटीक होऊन राहण्यापेक्षां स्वतःची धनीण असणें बरें. त्यांतून असल्या मेंग्यांशीं तर मी कधीं कधीं लग्न करणार नाहीं.

**रणधीर**०–बाई, तुम्ही स्वस्थ असां. आपल्या मनांत जसें आहे,

तसेंच पण आमच्याही मनांत आहे. आमच्यावद्दल आपण बिलँ-कुल धास्ती बाळगूं नका. जन्माची गांठ आणि ती आपल्याशीं! ह्मणजे आमच्या जन्माची गांठ आंवळलीच! हा पहा आपल्याला दुरूनच दंडवत करतों.

**राणोजी०**-रंभाजीराव, मीही तुमच्या हस्ताला अस्पर्श करतों. जयआई मातुःश्री, आ-आमच्यावर अवक-क-कृपा कर. आ-आ-आह्मीं तुझ्या वा-वाटेस ह्मणून जा-जाणार नाहीं; तूं या को-कों-बड्याला रा-राखशील तर तुला मा-माझा बळी देईन. (सर्व हंसतात.)

**त्राटिका**-अहा मेल्या भागूबाई! बायकोप्रमाणें पहा कसा नव-ऱ्याच्या हाताला हात लावतो आहे! मेल्या, तुझा बळी घेऊन मला काय करावयाचें आहे? तुला जिवे नकोसा झाला असला तर टाक नेऊन कुत्र्यापुढें! उगी बाळांनों, भिऊं नका बरें! या त्राटिकेच्या मनांत तसें करावयाचें नाहीं, नाहींतर ही पाहिलीत का फणी? (नखें दाखविते.) हिनें तुमचे कोंवळे चेहेरे चांगले शृंगारले असते. मागें कां सरतां असे? एकदां सांगितलें ना भिऊं नका म्हणून? आणखी संभाळा, पुनः जर मनधरणीचें नांव काढाल तर तुमचीच मानधरणी होऊन गचांडी मिळेल.

**रणधीर०**-जय माते भवानी, जय खंडोबा, या राक्षशिणीपासून आमचें रक्षण कर!

**राणोजी०**-परमेष्ठिता, आमची रक्षा कर! (दोघेही एकमेकांशीं कांहीं कुजबुजतात.)

**येसाजी**-(**रंभाजीरावास**) हुश्-धनीसाहेब, ही पाहिलीत का मौज! ही निव्वळ वेडी तरी असावी किंवा बेसुमार फाजील आणि चढेल तरी असावी. आणखी या वेडेपिरानें हें नवीन सोंग काय आणलें आहे! काय पण बोलण्याची विचित्र तऱ्हा ही!

**रंभाजी०**-(**कमळे**कडे सारखी दृष्टि लावून) अरे मजा काय ह्मणतोस! मजा नव्हे हा ब्रह्मानंद आहे! छेः, आपला पाय येथून हालत नाहीं. किती मोहक तरी चेहरा आहे हा!

ळ्यींच नादांत. यांनीं या धाकटीला प्रत्यक्ष पाहिल्यानें तर यांचा निश्चय अधिकच ठाम झाल्यासारखा दिसतो.

**धनाजी०**-गृहस्थहो, समजलों. तुह्मांला या गोष्टीचा विचार करावयाचा आहे. ठीक आहे.. करा विचार सावकाश. माझा निश्चय मात्र ढळावयाचा नाहीं. कमळे, तूं जा आंत. तुला वाईट वाटूं देऊं नको. तुझ्यावर माझें प्रेम आहे तसेंच आहे.

**आटिका**-उगी बाळ, ललूं नको बलं. माझी छकुलीग ती. ( **धनाजीरावा**कडे पाहून ) तुझ्यावरचें ह्मणे माझें प्रेम आहे तसेंच आहे! जसें कांहीं कोणी ह्मणेल खरेंच. डोळ्यांत बोट घालावयाचें आपणच आणि वर रडतेस कां ह्मणून पुसावयाचें. माई, रडग तूं, रड, रड. ( हळूच एक गालगुच्चा घेते. )

**कमळा**-ताई, बाबांचें मन कसें आहे हें मला समजतें बरें का! आणि तुला सांगतें, तूं इतकी माझ्यावर प्रेम करूं नकोस. हें पहा ( गालाला हात लावून ) तुझ्या प्रेमाचें चिन्ह! मला नाहीं बाई हें सोसत. बाबा, मी कांहीं आपल्या आज्ञेबाहेर वागावयाची नाहीं. आजपासून माजघरच्या उंबऱ्याबाहेर पाऊल ह्मणून टाकावयाची नाहीं. [ आंत जाते.

**आटिका**-कां, फारशी जीभ सोडली आहेस? मला हें बोलणें समजतें बरें का. जशी कांहीं मी बाबांचें ऐकतच नाहीं! मोठी आली आहे शहाणी मला मर्यादा शिकविणारी. ही पहा मी आलेंच तुझा समाचार घ्यावयाला! ( तिच्या मागें जाऊं लागते. )

**धनाजी०**-हं! आनंदी हें काय? नको तिचा असा छळ करूं. ( तिला अडवूं पाहतो. )

**आटिका**-बाबा, नका मला अडवूं. नेहमीं आपलें पहावें तों तिचें असेंच तोऱ्याचें बोलणें! खचित सांगतें, मी आतां हें सोसणार नाहीं. मी आंत जाणार, साफ ऐकावयाची नाहीं. मला वाटेल तसें करणार. आपल्याला जपावयाचेंच असलें तर त्या नाजूक साजूक पुतळीला जपा. नाहीं तर हीं पाहिलींत का गिधाडें कशीं टपून बसलीं आहेत तीं.. त्यांतलें एखादें तिच्यावर झडप घालील हो! [ पाय आपटीत आंत जाते.

**रणधीर**०-( एकीकडे ) यावें बाईसाहेब, खुशाल यावें. आपण थेट नरकलोकाची जरी वाट धरली तरीआपल्याला कोणी आडवें येणार नाहीं. आपल्या अंगचे हे तीव्र गुण सहन करणारा कोणी असेल असें मला तर वाटत नाहीं.

**धनाजी**०-जाऊंद्या बोवा तिच्या मागें. नाहीं तर ही अवदसा त्या पोरीचें काय करील याचा कांहीं नेम नाहीं. ईश्वरानें ही एक माझ्यामागें साडेसातीच लावली आहे. एकदां हिचें लग्न झालें ह्मणजे सुटलों. हें पहा रणधीरराव आणि राणोजीराव, माझा निश्चय तुह्मांला कळलाच आहे. थोरलीचें लग्न झाल्याखेरीज धाकटीचें नख देखील तुमच्या दृष्टीस पडावयाचें नाहीं. धाकटीला आतां मी घरांतल्या घरांत एखाद्या चांगल्या विद्वान पुराणिकाकडून पोथ्यापुराणें ऐकवि[illegible] तसेंच तिला थोडें गायलाही शिकवावयाचें आहे. तुमच्या [illegible]हितीचें चांगले पुराणि[illegible] किंवा गवयी असले तर त्यांना माझ्याक[illegible]ऊन [illegible] लायक इसम [illegible]ले तर त्यांना मी मेहनताना चांगल[illegible] देईन. येतों आतां; रामराम. [ आंत जातो.

**रणधीर**०-क[illegible] आह[illegible]. या अवदसेच्या फाजीलपणाबद्दल धाकटीला शिक्षा, [illegible] फार बोलते ह्मणून धाकटीनें मौनव्रत धरावें, आणि हिला लाज विनय नाहीं ह्मणून धाकटीला अंधारकोठडी !

**राणोजी**०-जाऊं द्या तें. तूर्त आपले उच्छिष्ट हेतु संधान होत नाहींत हें तर ठरलेंच.

**रणधीर**०-तसें झालेंच तरी काय झालें ? आपण कांहीं प्रीतीच्या तडाख्यानें इतके बेमार झालों नाहीं कीं ती मिळत नाहीं ह्मणून आकाशाकडे डोळे लावून हुश्श हुश्श करीत प्राण सोडावा. पाहूं प्रयत्न करून साधलें तर. नाहीं तर या रणधीररावाला काय कमी आहे ? हजारों देखण्या मुली माझ्या प्राप्तीसाठीं रात्रंदिवस देवाला नवस करीत आहेत. महनत करून ही शरीराची गोटी उगीच नाहीं बनविली ह्मटलें !

**राणोजी**०-वाः राव, फारच उत्ताम्यं ! आपण जर असे ताकदवाले आहां तर त्या वरिष्ठिकेशींच कां नाहीं लग्न करीत ?

**रणधीर**०- छेः छेः छेः ! तिचें नांव काढूं नका.

**राणोजी**०-राव, आतां असें पहा, तूर्त आपली ही उर्ध्वा तर संपलीच. तेव्हां आपण दोघे एकदिलानें एक गोष्ट करूं या.

**रणधीर**०-हा उर्ध्वा शब्द फारच खुबीदार. मला वाटतें स्पर्धा शब्दाला हा नवीन पर्याय शब्द आपण आपल्या अद्वितीय अकलेच्या कोठींतून काढला असावा ! बरें कोणती गोष्ट एकदिलानें करावयाची ह्मणतां ?

**राणोजी**०-कोणती ह्मणजे ? त्राटिकेसाठीं एक वरपुरुष शोधून काढावयाचा. कां, कशी खाशी अल्प मुक्ति शोधून काढली ?

**रणधीर**०-फारच अल्प मुक्ति ! खरी मुक्ति लवकर मिळेल कदाचित, पण ही तुमची युक्ति साधा[illegible] ह्मणतां? या त्राटिकेला नवरा ? तो म[illegible] कोणी मिळेल असें वाटत नाहीं. एकादा ब्रह्म[illegible]स, नाहीं तर [illegible], [illegible] मिळाला तर कोण जाणें !



**राणोजी**०-अहो ते[illegible] पण मला [illegible] असा वरपुरुष मान्यवकोठींत मिळणें अशे[illegible], बायकांत जशी ही निपजली तसे पुरुषांत तुमच्या आमच्यासारखे जिवंत खर्वासिश्वर असावयाचेच.

**रणधीर**०-राव, आपण खर्वासिश्वर शोभतां खरे ! मला एकच संभव दिसतो. तिच्या बापाजवळ पैसा आहे आणि त्याला मुलगा नाहीं, तेव्हां या आशेनें जर कोणी कबूल झाला तर कोण जाणें. पण छेः बोवा, तिचें स्मरण होतांच अंगावर कांटा उभा राहतो ! ह्मणजे मी तिला भितों असें नका समजूं. हा गब्रू तिला दाद देणार नाहीं. पण असली बायको नको इतकेंच माझें ह्मणणें.

**राणोजी**०-आह्मी तरी तेंच म्हणतों आणि तिच्या त्या मुखतो[illegible]टिकावापुढें कोणाचा मारा लागेल ? मघाशीं बोलतां बो[illegible]तां तिनें अस्मादिकाला गर्दभराजपक्षी ह्मटलें — तें आहे का ध्[illegible]नांत ? तरी पण मला वाटतें, कीं पैशासाठीं ही घोरपुतना

गळ्यांत बांधून घ्यावयाला तयार होणारा एकादा लालाचा हा भेटेल.

**रणधीर०**-कोण छाती करणार असेल तो करो. मी तर सांगतों, कीं माझ्या चौपट गड्याशीं खडकाळ माळावर कुस्ती करण्याचें मोठ्या खुषीनें पतकरीन, पण हा संबंध नको.

**राणोजी०**-चला, आतां याच उद्योगाला लागूं. ही धोंडिका वाटेंतली उपस्थित झाली ह्मणजे मग आमची ऊर्ध्वा आहेच.

**रणधीर०**-जावें आतां, माझी तालमीची वेळ झाली. सकाळ संध्याकाळ मेहनत करावी तेव्हां हें असें शरीर बनतें, समजलां? चला, तुह्मांला दोनचार खुबीचे पेंच शिकवितों [ दोघे जातात.

**रंभाजीराव व येसाजी** पुढें येतात.

**येसाजी**-राव, काय हें? नुसती दृष्टादृष्ट झाली नाहीं तोंच आपण इतके बेहोप होऊन गेलां?

**रंभाजी०**-अरे, ज्याला घाय लागला नाहीं तो जखमेचें दुःख काय जाणणार? मला ही प्रीति आणि मदन या साऱ्या थापा वाटत होत्या. पण झालें, तें सारें तत्त्वज्ञान त्या एका कटाक्षाच्या घायाबरोबर लटपटलें. तिचें वर्णन ऐकल्यापासूनच माझें मन आतुर झालें होतें. प्रत्यक्ष दर्शनानें तर मी सर्वस्वीं तिचा दास होऊन गेलों आहें. तिला मिळविल्याशिवाय परत घरीं जावयाचेंच नाहीं.

**येसाजी**-एकूण या मदनानें आपल्याला पुरें घेरलें आहे! तेव्हां आतां याचा निषेध करण्याची कांहीं वेळ राहिली नाहीं. एकदां प्रीतीचें मूळ हृदयांत शिरलें, कीं तेथून हृदयाला घेतल्याशिवाय ते उपटून निघावयाचेंच नाहीं.

**रंभाजी०**-हें पहा आतां ही मीमांसा पुरे कर आणि पुढचा उपाय सांग. इकडे रोग्याची आली आहे प्राणांतिक अवस्था आणि वैद्यबोवांचा चालला आहे वाद-चरक श्रेष्ठ का वाग्भट?

**येसाजी**-पण काय राव, आपण तिकडे एकसारखे टक लावून

# पात्रांचीं नांवें.

धनाजीराव... ... ...कुसुमपूरचा एक श्रीमान् गृहस्थ.
प्रतापराव ... ... ...धनाजीरावाच्या वडील मुलीला मागणी करणारा.
रंभाजीराव... ... ...धनाजीरावाच्या धाकट्या मुलीवर लुब्ध झालेला.
येसाजी ... ... ...रंभाजीरावाचा एक सोबती.
राणोजीराव / रणधीरराव ... ... धनाजीरावाच्या धाकट्या मुलीला मागणी करणारे.
शंभूसिंग ... ... ...रंभाजीरावाचा बाप.
म्हातारा ... ... ...मणीपूरचा एक गृहस्थ.
पिल्या ... ... ...प्रतापरावाचा गडी.
तान्या ... ... ...रंभाजीरावाचा गडी.
तुक्या, म्हशा, बेरड्या, दगड्या, सोवळेकरी. ...प्रतापरावाच्या घरचे चाकर.
त्राटिका ( आनंदी ) ...धनाजीरावाची वडील मुलगी.
कमळा ... ... ... ,, धाकटी मुलगी.
सारजा ... ... ...राणोजीरावाची बायको.

शिंपी, कापडवाला, मोतीवाला, सोनार, गडी वगैरे.

पहात होतां ह्मणून विचारतों, तेथली खरी मौज आपण पाहिली का?

**रंभाजी०**–अरे नुसती पाहिली काय? या हृदयांत सांठवूनही ठेविली. काय तिचें तें मोहक स्वरूप! विनय आणि सुविचार यांची छबी चेहऱ्यावर कशी सुरेख रेखली आहे! मी खचित सांगतों, कीं मेनकादि रंभांचें स्वरूप पुराणांतरीं खूप वर्णिलें आहे; पण हिची सर त्यांना नसावी. झालें; या रंभाजीच्या स्वातंत्र्याचे दिवस संपले. याची स्वामिनी, देवता ती कमळा. तिच्या आराधनेवांचून आतां दुसरा उद्योग नाहीं.

**येसाजी**–तर मग आपण ती मौज पाहिलीच नाहीं. मी ह्मणतों ती मौज अशी गुळचट नाहीं – तिखट मौज आहे. आपण तो कर्कश कानटाळ्या बसण्यासारखा आवाज ऐकला का?

**रंभाजी०**–येसाजी! तूं मूर्ख आहेस. तिच्या आवाजाला कर्कश कानटाळ्या बसण्यासारखा समजतोस तूं? अरे, कोकिळेच्या स्वराहूनही मधुर. अजून माझ्या कानांत गुणगुणतो आहे.

**येसाजी**–भली केली रावसाहेब, त्या कैदाशिणीच्या आवाजाला जर आपण इतके भुललां आहां, तर म्हणतों एकदम जाऊन तिला मागणी कां कराना, ह्मणजे धाकटीवर लुब्ध असलेल्या त्या दोघा गृहस्थांचा रस्ता तरी खुला होईल.

**रंभाजी०**–मागणी करीन; पण ती मला मिळेल कारे?

**येसाजी**–न मिळायला काय झालें? तिचा बाप धांवत येईल आपल्यापाशीं आणि हातांपायां पडून स्वीकारा ह्मणेल.

**रंभाजी०**–काय म्हणतोस? चल तर मग, चल. आतां विलंब नको.

**येसाजी**–पण दूरवर विचार केला आहे का आपण? तिचा स्वभाव आपल्याला पटतो का? पहा बोवा, आपलें कांहीं जात नाहीं.

रे, विचार कसचा करावयाचा! तिची ती मनो-
करणांत कशी ठसून गेली आहे. तिच्याशिवाय
दिसत नाहीं. किती सौम्य व सभ्यतेची मुद्रा,

किती विनय, किती मधुर व मितभाषण! छेः, येसाजी, आतां आपल्याला नाहीं धीर धरवत.

**येसाजी**-राव, आपण शुद्धीवर आहां का? हें त्या त्राटिकाबाईचें का वर्णन? हीच का आपण मौज पाहिली! रामराम तर मग. मी आपला परत जाऊन बाबासाहेबांना सांगतों, कीं आपले चिरंजीव बनले पक्के वेडे. त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीं दुसरा कोणी तरी पाठवा. आपल्या हातून तें होत नाहीं.

**रंभाजी०**-येसाजी, तूं मला अगदीं वेडा ठरविलास आं? मी वेडा झालों आहें, पण तूं ह्मणतोस तसा नाहीं. त्या कमळेच्या डोळ्यांनीं मला वेडें करून सोडलें आहे.

**येसाजी**-तर मग ती मिळवावयाच्या प्रयत्नाला लागा.

**रंभाजी०**-तोच विचार आहे; पण कायरे येसाजी, तिला कोंडून ठेवून पुराणें वाचण्याकरितां एक पुराणीक ठेवणार आहेत. नाहीं?

**येसाजी**-रावसाहेब, आपल्याला कां बरें याची चौकशी? आलें माझ्या लक्षांत! शाबास! भली केली!*

**रंभाजी०**-काय तें?

**येसाजी**-दुसरें काय? पुराणीकबोआ शोधावयाला फार दूर जावयाला नको.

**रंभाजी०**-तूं अगदीं मनकवडा आहेस बोआ! पण हें साधेल का?

**येसाजी**-कसें साधावें? आपण पुराणीक होऊन तिचें मन वळविण्याचा प्रयत्न करणार. पण इकडे तिच्या बापानें त्या मागणी घालणारांपैकीं एकाद्याशीं तिचें लग्न लावून दिलें ह्मणजे?

**रंभाजी०**- तें सारें जुळण्यासारखें आहे. तुझी मात्र मदत मला असली पाहिजे. अगोदर असें पहा, थोरलीचें लग्न झाल्याशिवाय धाकटीचें करावयाचें नाहीं हा आहे ह्मातार्‍याचा निश्चय. थोरलीला मागणी करावयाला इतक्यांतच कोणी तयार होईल असें मला दिसत नाहीं. दुसरें या गांवांत माझ्या वडिलांच्या ओळखणारे पुष्कळ आहेत; पण मला कोणीं प्र तेव्हां या गांवांत तूंच हो रंभाजीराव आणि रा

विषयीं मागणी कर. मी घेतों पुराणिकाचा वेष आणि करतों किल्ल्यांत चोरून प्रवेश. आंतून बाहेरून असा दोहोंकडून भडिमार झाल्यावर किल्ला कसा हातीं येत नाहीं पाहूं. बरें मग ठरलेंना ? दे तर तुझें अंगरखांपागोटें काढून आणि तूं चढीव माझा पोषाख, आटप आतां कांकूं नको.

**येसाजी**-राव, जरा दमानें घ्या; मी आहें सच्चा माणूस. आपल्याला नाहीं लांडीलबाडी खपत. तेव्हां अगोदर यांत कांहीं कपट नाहीं अशी माझ्या मनाची खात्री करून घेऊं द्या. आपण प्रवासाला निघालों, तेव्हां आपल्या वडिलांनीं मला जवळ बोलावून सांगितलें, " येसाजीराव, तूं आहेस शहाणा, अनुभविक. रंभाजीला नीट जप. भलत्या नादीं लागूं देऊं नको. त्याचें कांहीं उणें पडूं देऊं नको. "

**रंभाजी०**-( त्रासानें )-किती चेंगट आहेस बोवा तूं !

**येसाजी**-आपण आपल्या योग्य स्त्री मिळवूं पाहणें हा कांहीं भलता नाद नव्हे. तेव्हां प्रामाणिक येसाजीनें याप्रमाणें वागण्यास कांहीं हरकत नाहीं. ठरलेंच. राव, आहे आपल्याला कबूल ! हे घ्या कपडे. पहा तर खरा आतां या रंभाजीचा थाट. थोर झाल्यावर कसें वागावें, कशी ऐट असावी, हें आह्मांपासून शिकावयाची तुमच्या नशिबानें चांगली संधि आली आहे.

**रंभाजी०**-अरे, पुराणिकाचा वेष घेऊन तिचें मन वळविण्यांतील मुख्य हेतु तूं नाहीं समजलास. तशा स्थितींत असतां तिचा खरा स्वभाव व चालचलणूक नीट लक्षपूर्वक पाहावयाला सांपडेल. चल तर, त्या तिकडे जाऊन कपडे बदलूं या. [ जातात.

**तान्या** येतो.

**तान्या**-मला कामाला जाऊन वाढूळ झाला म्हून धनीसाब अर्शी गरम झाल असत्याल. त्या तांबुळणीच्या दुकानांत वाइच तंबाकू खायापायी टेकलों आन मंग तिनं बो-बोलून आन मु-मुरडून आन डोळ मा-मारून माझा जीव अर्शी बेजार केलान. पोरगी पन फटाकडी हाय. आपुन तिची वळाख दाट करून घेनार.

म्हंजी जिवाला वाइच मजा करायला गावल. पन् ह्ये धनीसाब आलच जनू.

**रंभाजीराव व येसाजी** वेष पालटलेले येतात.

**रंभाजी०**---तान्या, आलास का? गाढवाच्या लेका, होतास कोठें इतका वेळ ?

**तान्या**-जी धनीसाब-पन धनीसाब कोनत ? ह्ये का ह्ये ? हाय तरी काय ह्यो ख्योळ आं ! ( **येसाजीकडे** वळून ) धनीसाब ! थूः तुझ्या जिनगानीवर गाढिच्या तान्या. धन्यालाबी इसरलास ! अर ह्ये येसाजी ! ( **रंभाजीरावाकडे** वळून ) जी सरकार, गुन्हा माफ करा बगा. या येसाजीनीं आपल कपड चोरल हायती जनू ? का आपुन त्येंच चोग्ल ? का दोघांनीं दोघांच चोग्ल ?--का हाय तरी काय ह्ये ? भुताटकी तर न्हव ?

**रंभाजी०**-अरे चूप ! इकडे ये. मोठ्यानें बोलूं नकोस. हराम-खोरा, तुला कोठें होतास म्हणून विचारलें, त्याचा जबाब द्याव-याचें चुकविण्याकरितां हे थेर चालविले आहेस होय ? ऐक, आजपासून मी रंभाजीराव नव्हे, हा येसाजी तुझा यजमान रंभा-जीराव. याला योग्य मानपान देत जा. जर चुकलास तर बघ. याचें कारण समजेल मागाहून तुला.

**तान्या**-आपनासनी यांतल कायबी उमगत न्हाई बगा. कस म्हंता या येसाजींना धनीसाब म्हनूं व्हय ? आपल्या बाच्या हातून-बी त्ये व्हायचं न्हाई. काय नशीब बगा. 'रंभाजीराव' म्हन ! पन धनीसाब मला का न्हाई करीत तस ? मीबी बगा कसा थाट आनतो. येसाजींच्या वर तान केली न्हाइ तर मिशीच उतरून देईन. मिशीबी न्हाई चांगलीशी काढाया म्हना.

**रंभाजी०**-पुरे आतां हा चहाटळपणा.

**येसाजी**—अरे तान्या, मीं चारचौघांत तेवढा रंभाजीराव. तेथें तूं कदाचित् चुकलाबिकलास तर खाशील थोडासा मार, नाहीं तर चार शिव्या. पण तुहीं आम्हीं एकटे असल्यावर मी येसाजीच आहें. ध्यानांत ठेव बरें. पण राव, एक गोष्ट आपल्या मोठी जिवा-

वर आली आहे. मी तुमच्या नांवानें व वेषानें कमळाबाईसाठीं मागणी करावयाची, आणि अखेर लाट मारावयाचा तुह्मीच.

रंभाजी०—पण अगोदर हें पहा. मला रंभाजी ह्मणून हांक मारूं नको. आणखी एक दुसरी गोष्ट करावयाची आहे, पण तिच्याविषयीं बिऱ्हाडीं स्वस्थपणें बोलूं. चला आपल्याला भूक लागली आहे. [ **रंभाजीराव व येसाजी** जातात.

**तान्या**—ह्यो कावा कायबी न्यागाच दिसतुया. ( आंतून "तान्या" म्हणून हांक येते. ) जी आलों की. कायका असना. त्ये कायबी करनात. त्ये हायत धनी. तान्या ल्येका, तुला कशापायीं त्येची पंचात ? गाढवावानी गुमान आपल काम करावं. ध्ये थोबाडांत मारून येक. ( आंतून 'तान्या' म्हणून हांक येते. ) जी आलों धनीसाब. वाइच दमबी घ्येऊं देत न्हाइत बगा. [ जातो.

---

## प्रवेश २ रा—कुसुमपूर—राणोजीरावाच्या घरापुढें.

**प्रतापराव** आणि **पिल्या** येतात.

**प्रताप०**—आमच्या विजयपुरास रामराम ठोकून बेत केल्या प्रमाणें प्रथम या कुसुमपुरांत तर येऊन पोंचलों. येथें अगोदर आपल्याला राणोजींची गांठ घेतली पाहिजे. त्याला भेटून किती तरी दिवस झाले ! अरे, मला वाटतें हेंच त्याचें घर. वाः शंकाच नको. पिल्या, गाढवा, पुढें कोठें चाललास ? हुं, पहातोस काय ? मार थाप.

**पिल्या**—थाप मारू व्हयं ! कोनती थापजी-तोंडाची का हाताची ? आन कोनाला मारूं ? कोन हाय हत ? आपनामनी कोनी शियाबिया दिल्याती व्हय ?

**प्रताप०**—गाढवाच्या लेका—

**पिल्या**—हां धनीसाब ! त्यं न्हवं बगा. मला होवं तर गाढंव म्हना. पन माझ आईबाप कोनी काढल त त्येची मला लई चीड हाय. माझ्या बानं आपलं काय केलं जी ? माझ्यावानी तो आपला चाकुरी होऊन चाबूक खात न्हायला असता तर मात्र खचित गाढव व्हता.

**प्रताप०**—झाली टकळी सुरू हरामखोराची. या चोराला उठतां लाथ आणि बसतां बुक्कीच पाहिजे. जरा वेळ गेला कीं याची आठवण बुजालीच. (चाबूक सरसावून) पिल्या, संभाळ, मी सांगतों असें ताबडतोब कर. लगाव ठोसे, अब्बीके अब्बी, खूप जोरसे—

**पिल्या**—बरं हाय तर मग लगावतोच ठोस. पन धनीसाब कोनाला लगावूं जी ठोस? हत तर कोनबी न्हाइ. वाइच दावा तर खर कीं बगा कसा मारा करतो त्यो.

**प्रताप०**-अरे गद्ध्या, तूं आला आहेस आज मार खावयाच्या बेताला. ठीक आहे. पुनः सांगतों बघ, जोरानें ठोठाव, एकदम ठोठाव, मारे बोंबाबोंब करून दे. असें मिळमिळित ठोठावणें मला मुळींच आवडत नाहीं. हुं! विचार कसला करतोस? काढतोस आवाज का काढूं तुझ्याच डोक्यांतून आवाज?

**पिल्या**-तसं कशापायीं सरकार? मी हायना त्याच तयारीमंदी. (अस्तन्या सारतो व घोंगडी कमरेभोंवती गुंडाळतो.) यजमानसाबांनीं आज गोळीबिळी चढिवलीया तंनू म्हून भांडान काढत्याती. बर हाय धनीसाब, ठोस देतोच तर बगा. मंग जर का कमजास्त झालं तर मला न्हाइ दकल. मागून भानगाडबिनगाड नको म्हून म्हंगतो.

**प्रताप०**-असें काय? तूं आज फारच बेजबाब बोलूं लागला आहेस. चिलीमबिलीम झोंकली आहेस वाटतें. थांब तुझा कैफ उतरतों बरें एकदम. (त्याचा कान धरून पिळतो.) कशी आहे मात्रा! लागू पडली का? का उगाळूं आणखी दोन वळसे? लकडीशिवाय मकडी वळत नाहीं.

**पिल्या**-(भुईवर लोळत व ओरडत) मेलो, मेलो! धावा! खून, खून! आमच्या धनीसाबास्नी अक्षी खूळ लागलंया. धावा बिगिबिगी.

**प्रताप०**-बघा कसा माजोरी आहे तो. मार खाल्लान् तरी पुनः गाढवासारखा पाहिजे तें बरळतो आहे. पिल्या, उठून ठोठावतोस कीं नाहीं, का देऊं आणखी न्याहारीला?

**पिल्या**–नग नग सरकार! लई झाल. माझी भूक इकीं न्हाइ धनीसाव.

**राणोजीराव** येतो.

**राणोजी**०–अरे आहे तरी काय? कोण ओरडला तो?–कोण पिल्या–आणि हे कोण? अरे प्रतापराव! वाः मित्रा, केव्हां आलास? बरें, विजयपूरची मंडळी सारी खुशाल? (एकमेकाला कडकडून भेटतात.)

**प्रताप**०–घाबरून आलास वाटतें बाहेर? अरे, तुला ठाऊक नाहीं, तो पिल्या आहे. पक्का कांगावखोर. एकपट असलें तर दसपट दाखवील. त्याचा आमचा हा विनोद झाला. नेहमींचा आहे हा. त्याला आपल्या चाकरीपेशाचा विसर पडतो म्हणून मधून मधून त्याला अशी ही आठवण द्यावी लागते. खरोखर माझा प्यारा दोस्त भेटलास ह्मणून किती आनंद झाला आहे सांगूं?

**राणोजी**०–अरे, व्हावयाचाच तो. तुला एकट्यालाच का तो झाला आहे? स्नेहाची तर हीच मजा! एकाला ब्रह्मानंद झाला कीं दुसऱ्याला औदास्य समुस्थित झालेंच! एकाचें औदास्य तोच दुसऱ्याचा उल्हास. आहे कीं नाहीं अजब गम्मत. आं! प्रतापराव हसतोसरे कां?.

**प्रताप**०–हसूं नको तर का रडूं? अरे वेड्या, हा तुझ्या बोलण्याचा प्रकार पाहून शहाणा देखील वेडा बनावयाचा! ही नवीन विद्वत्ता कोठें पैदा केलीत आपण?

**राणोजी**०–प्रतापराव, मी तुला फार धूर्त समजत होतों! पण कांहीं नाहीं. अरे, आमच्या या अस्मानीसुलतानी भक्षणांतलें इंद्रित तुला नाहींच कळावयाचें! अरे स्त्री वाशिष्ट करून घेण्याचें हें उत्सृष्ट संधान म्हणून हा भक्षणव्यतिपात आह्मीं घेतला आहे समजलासे. पिल्या, असा लोळतोस काय? ऊठ. प्रतापराव, चल आंत.

[ तिघेही घरांत जातात.

**पिल्या**–ह्यो उठलो बगा. काय ह्मंगतां? धनीसाबांनीं तुमांस्नी म्यां कांहीं चिलीमबिलीम वढल्याचं सांगितलं व्हय. ह्या माळेच्यान बगा आपुन चिलिमीला शिवलो असेन तर. बाकी तुमच्या

कानांत सांगतो बगा, आज धनीसाबांनींच कायबी हकडंतकडं केलंरा. 'कसं वसकन् कुत्र्याबानी अंगावर येत्याती न् काय ? येंचं रातदिन ह्यें असंच. त्येस्नी आतां आवा होवी.' तरन जान मरद् बाईल नसली म्हंजीं असंच करत्यात. येनी जर बिगिबिगी लगिन करूनशान घेतल न्हाइ तर आपल्याला येंची नोकरी सोडावी लागनार.

**राणोजी०**– पिल्या असं कोठें झालें आहे ! अरे, माझा मित्र तुझा फार जुना सेवक आहे. लहानपणापासून तुमची दोघांची जोडी. याची नोकरी सोडणार तूं ?

**प्रताप०**–अरे, तो कसचा नोकरी सोडतो ! त्याला मी आणि मला तो–त्याचें दुसऱ्या कोणापाशीं पटावयाचेंच नाहीं. होय कीं नाहीं पिल्या ? ( चाबूक उगारतो. )

**पिल्या**–( दूर सरून ) व्हय, व्हय, मग्कार. हायच आपलं तसं पग्म माझ्यावरन काय ? ह्यो बगितलात मामला, दादासाब ? नोकरी सोडूं नको. तर मंग काय करूं ह्मंगतां ?' ह्यें बगा. आतां तुमीच न्याव करा. ह्येंचा मी अगदीं बचपनऱ्पुन चाकर हाय खरा. पन्न मानुस गरीब झालं म्हुन किती मार खाइल ? मी ह्मंगतो धापाच चाबुक दिसांतनं खाव लागल तर लई झाल. पन येंचा झपाटा कांहीं मुलुखाऱ्याराच. धापाच तर सकाळच्या न्हारीलाच 'मिळत्यात. आतां आपुन सांभालका असं ?

**राणोजी०**–( हंसून ) आपल्याला नाहीं बोवा. अजून तसा अतिप्रसंग पारपत्य झाला; ह्मणून नाहीं सांगवत.

**पिल्या**–ह्यें बगा. मी सांगूं तुमांस्नी मगाच्या तंट्याचं मूळ ? ह्ये हन आल आन मला कसं ह्मंगतात "हूं, लगाव ठोस, जलदी, आतांच्या आतां लगाव." यत बगा त्येंच्या आन माझ्या बिगार कोनबी न्हवत. 'मग कस ह्मंगतां ? मी धनीसाबांस्नीं ठोस लगवाव व्हय ? लोक काय ह्मंगत्याल ! थुंकत्याल कीं तोंडावर.

**प्रताप०**–किती गाढव आहे हा ! अरे मीं याला दहादां सांगितलं कीं पिल्या, दार ठोठाव. पण ऐकेल तर शपथ. मग थोडीशी किल्ली देऊन—

**पिल्या**–हं हं धनीसाब, खोटं बोलनं लई वंगाळ, आपीनासारख्या थोर गिरिस्तांनीं तर कंदी कंदी खोटं बोलूं नवे. आपुन तोंडातन दारावर असा शबुद तरी काडला ? ह्मन हतं ठेठाव, लई जीरानं ठेठाव, मला मिळमिळीत ठेठावनं आवडत न्हाइ ! मला काय ठाव यांचं दारबिर ! मी कायसमाजलों कीं आज धनीसाबांशी पाठवीठ लई रगडून घ्याची हाय ! म्हुन अस्तन्याबिस्तान्या सारून करतो तय्यारी तो आल एकदम वागावानी अंगावर अन् हुं काय, दिला पलाखतीचा मार ! माझंच धोरान चुकल बगा.

**प्रताप०**–पिल्या, तोंड आटपतोस का नाहीं ?

**राणोजी०**–अरे, थांबरे, त्याची वल्गना काय आहे ती तर ऐकूं दे. कशी धोरणा चुकलीरे ?

**पिल्या**–कसं चुकलं व्हय ? ह्ये बगा त्येंनी हुकूम करतांच मीं का त्येंना खालीं पाडून त्येंची पाठ चांगली मऊ केली असती ह्मंजी माझं असं कशापायी व्हतं ! ( दूर उभा राहतो. )

**प्रताप०**–बरें बरें, मोठा फाजील झाला आहे नाहीं तर. ( हात उगारतो. )

**पिल्या**–हं ह्ये बगा दादासाब. कस पिसाळल्यावानी करत्यात त्यें. एकाद्या देवरुशाला तरी येसनी नेऊन दावावं ह्मंगतो.

**प्रताप०**–अरे हरामखोरा ! ( एकदम कोरडा उडवतो; **पिल्या** पळून दूर जातो; **राणोजी** मध्यें घुसतो त्याला तो लागतो. )

**राणोजी०**–हा प्रहा दोघांच्या लाभांत पडण्याचें भांडण ! म्हणतात कीं नाहीं ' शिष्या पळाल्यास दोर्दंड. ' पिल्या, चूप रहा. प्रतापराव, खरोखर तूं फारच झांज्वलय. अरे, पिल्या तुझा जुना, अभिमान्य गमत्या चाकर—त्याच्यावर कोरडा ? बरें तें राहूं दे. तूं अगोदर हें सांग, कोणत्या नशिबाच्या लाटेवर अस्मादिकांची स्वारी उडत आली ?

**प्रताप०**–( हंसून ) अस्मादिकांची ह्मणजे माझी वाटतें ? अरे, कोणत्या म्हणून काय विचारतोस ? नेहमींच्याच. तरुणपणांत आपल्या गांवाला कंटाळून दिग्विजय करण्याकरितां आणि द्रव्य आणि अनुभव मिळविण्याकरितां आमच्यासारखी तरुणमंडळी जिच्या

स्वाधीन आपलें जिणें करतात तीच. बाबा वारल्याचें मीं तुला मागेंच कळविलें होतें. तेव्हां घरची सर्व व्यवस्था ठाकठीक लावून चार पैसे टाकले खिशांत आणि निघालों यात्रेला. यात्रेंत आणखी एक हेतु आहे.

**पिल्या**–मी होरूं का तो कोणता.त्यें ! ( **प्रतापराव** त्याच्याकडे रागानें पाहतो. ) न्हायलं ह्यें बगा मारलं तोंडाला टाळं.

**राणोजी**०–आणखी तें उच्छिष्ट कोणतें बोवा ?

**प्रताप**०–अभीष्ट होय ? सांपडल्यास साऱ्या धनदौलतीला मालकीण पहावयाची.

**राणोजी**०–( आपल्याशीं ) हें संधान ठीक दिसतें आहे ! त्राटिकाबाईची व्यवस्था लावावयाला ही संधि कशी आपोआप आली आहे. ( उघड ) प्रतापराव, तुझें उच्छिष्ट अगदीं रास्त आहे. या अशा तारुण्यकांत आणि तशांतून हातीं संपत्ति मनमुरातब आल्यावर तावडतोब विधवा करणें हेंच उत्तम ! आहे, एक लावण्यलत्तिका आहे; पण नको, तिचें नांव नको. तूं माझा खरा जिवाच्या कंठांचा दोस्त, तेव्हां तुझ्या घोरपडींत तिचा गळा अडकविणें ह्मणजे बेमार निमकहलाली. बाकी मुलींबरोबर विफुल द्राव्य हातीं येईल.

**प्रताप**०–बाबारे, हें तुझें अलंकृत व पोक्त भाषण पुरें कर. माझें बोलणें नीट ऐकून त्याचें सरळ उत्तर दे.

**राणोजी**०–प्रतापराव, तुला मी पहिल्यापासून अज्ञान करतों, तूं कट्टा दुरभिमान्य आहेस, तुझ्यासाठीं मी माझ्या भक्षणाचा घटस्फोट करून सांगतों कीं, एक मुलगी आहे. पण बोवा, मी निमकहराम स्नेही असल्यामुळें तिचें नामाभिधान्यही तुजपुढें काढणें वाजवी नाहीं.

**प्रताप**०–राणोजी, तुझ्या माझ्यांत निष्कपट स्नेहसंबंध आहे, तेव्हां तुला हें असें वाटतें हें ठीकच आहे. पण पाल्हाळ न करतां तुला मी स्पष्ट सांगतों, कीं मला बायको पाहिजे आहे, मग ती स्वभावानें कितीही दुष्ट असो. पण आतां बोलण्यांत वेळ घालविण्यांत अर्थ नाहीं. सांग, सांग ती मनमोहिनी कोठें आहे ती.

**राणोजी**०–नाहीं बोवा, अस्मादिकांजवळ मीं तिची गोष्ट काढली हा मीं अस्मादिकांचा उपरोध केला. माझ्या परमेष्ठ स्नेह्याचा कंठ या घोरपडींत घातला असें ऐकलें तर लोक मला काय ह्मणतील !

**पिल्या**–( एकीकडे ) आमंच धनीसाब बगा कम मोकळ्या दिलाच हैती. त्येंनी पैसा होवा. डबोलं घावलं ह्मंजी बायकु कशी का असना. एखादी थेरडी, थोबाडांत दांत न्हाइत, पेकाट लई वाकून गेल्याल, अंगामंदि रोगानरोग भरलेला, डोसक्यावर योकबी क्याम न्हाइ, धा हातावरन घाण मारतिया-अशी का व्हाना, ही स्वारी राजीच. रुपई-घावल ह्मंजि झालं.

**प्रताप**०–राणोजी विचारांत कसल्या पडला आहेस ! तूं मनांत बिलकुल शंका आणूं नकोस. तूं जर मला तिचें नांवगांव सांगणार नाहींस तर तुझें माझ्यावर खरें प्रेम नाहीं असें मी समजेन.

**राणोजी**०–बरें बोवा. तुला श्रवण करतों. हा विषय मीं चेष्टिकेनें काढला; परंतु तुझा अन्याग्रहार फार ह्मणून आतां तो अट्टाहास्य साग्रांत सांगतों. मुलगी विधवाई आहे खरी. ( **प्रतापरावाच्या रागावलेल्या मुद्रेकडे पाहून** ) रागावूं नकोस. माझ्या मुखग्रासांत मक्षिकेसारखे हे संस्कृत शब्द खिळले आहेत, कारण दोन मासे घालवून मी हें विद्युत भक्षण शिकलों आहें. माझ्या त्या स्मृतिगत मणभारी सुंदरीपुढें जेव्हां मी पोपटाप्रमाणें बोलतों तेव्हां तिच्या अंतःकारुण्याची काय त्रिविद्धता उडते ती पाहिलीस तर या बहाद्दराच्या पृष्ठीवर तूं खात्रीनें थाप मारशील. पण तुझ्याकरितां पाहतों अडाणी शब्दप्रयोजन निषिद्ध होतें का. स्वरूपानें खपसूरत, नाहीं बदसूरत, असून हजारांत चमत्मणारी-( **प्रतापरावाच्या कपाळाला आंठ्या पडलेल्या पाहून** )–नाहीं चुकलों–पुनः प्रयत्न करतों–ती पहा भरज्वानी अंगांत मुसमुसणारी, ठेंगणी ठुसकी, चांगुल्या कुळांतील आहे. संपत्ति तर काय सांगूं ! तिच्यासारखी श्रीमंती फारच थोड्यांच्या नशिबीं असते;–पण तिच्यांत एक गोम आहे. गोम मात्र पठाडी ! ती हीच, कीं ती अतिशय कजाग, भांडखोर, बेमुरवतखोर आहे. द्वाडपणांत तिचें पाणिग्रहण करणारी स्त्री मात्या दुनियेंत मिळावयाची नाहीं.

**प्रताप०**—राणोजी, आतां कसा ठीक बोललास ! तरी शेवटीं शेवटीं मूळ वळणावर गेलासच. तें असो; पण तूं अगदीं भ्याड आहेस. पैशांत काय जादू भरली आहे ती तूं जाणत नाहींस. बस्स, तिचा पत्ता सांग.

**राणोजी०**—पहा बोवा तूं आपला समाचार.. तिच्या वडील पित्याचें नामाभिधान्य धनाजीराव. तो श्रीमंत गर्भवान् असून सभ्यवान् व अगत्य आहे; मुलीचें पाळण्यांतलें नामकर्ण आनंदी, परंतु तिचें आवडतें व लोकांत प्रसिद्ध असें नांव त्राटिका.

**पिल्या**—( एकीकडे ) यं. या तर्टिकाबाई का आमच्या धनीन व्हनार ! ह्यंजी ठीक जुळलं. ह्यो ह्मसोबा आन् ती सटवाई ! या कातरींत आमा चाकुरमाणसांचा रोजगार बेस व्हनार !

**प्रताप०**--ठीक आहे. तिच्या बापाचें नांव मीं ऐकलें आहे. बाबांची आणि त्यांची चांगली जानपछान होती. तेव्हां त्यांच्याकडून कांहीं हरकत येईलसें दिसत नाहीं. आतांच्या आतां जाऊन मागणी करतों आणि तिलाही गांठतों. तूंही चल मजबरोबर.

**राणोजी०**--बरें, तुझी मर्जी; पण नको बोवा तिच्यासमोर पुनरामरनायच.

**पिल्या**--तुमी राव का मागं घ्येता ? त्येंचा दिल लागतुया तोच घ्या उरकून नी काय ! माज्यावानी जर कां तिला ह्यंचा अनबाव मिळल तर ती कशी का द्वाड असना अपसुक नरम येतीया. ती कितीबी वराडली तरी ह्ये बेगुमान व्हात्याल अन् मंग तिचं त्वांड दुखून ती गप्प व्हायली, कीं झालाच ह्यंचा तोंडाचा मारा सुरू. त्वांड व्हव त्ये, मुलुखमैदान तोप हाय. शिया दोन दोन घंट सारख येत् सुटत्यात् आन् खुबी ही, की त्यामंदी शिळी शिवी म्हुन यायचीच न्हाइ. लई गमजा करील तर देत्याल तोंडांत भडकावून आन् टाकत्याल करून एका तोंडाचीं दोन त्वांड. मग तिला अस व्हईल कां या तोंडानं वरडूं का त्या. आमच्या धनीसाहेबांस्नी आपुन् वळाकलू न्हाइ अजून.

**प्रताप०**-शाबास पिल्या. माझें वर्णन छानदार हुबेहुब केलेंस. घे हें बक्षीस. ( कोरडा उडवितो. )

**पिल्या**–बगा दादासाब !

**राणोजी०**–प्रतापराव, ठीक आहे. चला तर. ( तिघेही घराबा-हेर पडतात. ) अस्मादिकांच्या मनसास येत असेल तर मी कशा-ला आड येऊं ? त्यांत माझें हितच आहे. धनाजीरावाच्या येथेंच या अंतःकरणाची स्वाभिमानीं आहे. त्यांच्या कनिष्ठ कुमार्यके-वर माझें परिमित परिमळ आहे. तिचें नामाभिधान्य कमळा. पण वरिष्ठिकेचें लग्न झाल्याखेरीज कनिष्ठिकेचें कन्याधान करावयाचें नाहीं, हा धनाजीरावाचा निश्चयाभाव असल्यामुळें आह्मी तूर्त नि-राश्रित होऊन बसलों आहों. तूं आलास ही केवळ आमच्यावर परमेष्ठिताची पूर्ण अवकृपाच. ह्मणतात कीं नाहीं 'कर्म देतें आणि देव नेतो.'

**पिल्या**–( एकीकडे ) तरी मला या स्वारीचा संशय येतच व्हु-ता. या तर्टिकाबाईचं नांव यांनीं आमच्या धनीसाहेबांस्नी का सां-गितलं ह्यें म्यां आतां हेरलं. कसा मितर हाय बगा ! जो तो आपलाच कावा साधाया बगनार ! मग त्यांत दुसऱ्याचं काय का व्हइना !

**राणोजी०**–प्रतापराव, माझें ऱ्हुद्गत्य समजलें का तुला ? कारे, हसतोससा ?

**प्रताप०**–( हंसत हंसत ) बाबा, हे तुझे दाखले आणि हे शब्द यांनीं माझा जीव अगदीं बेजार केला. तुला काय ह्मणावयाचें अ-सेल तें चटकन् म्हण आणि सोडीव मला या जाचांतून !

**राणोजी०**–तेव्हां आतां तूंही माझें कर्तृत्व कर. कमळेला गाणें शिकविण्यासाठीं एक शिक्षक ठेवण्याचा धनाजीरावाचा विचार आहे. मला थोडेंबहुत गातां येतें आणि सतारही वाजवितां येते. ह्मणून मीं आतां घेतों एका मद्रासी गवयाचें सोंग. आमचा नाव बूमय्यारायलू. तुमी आमचा दनाजीरावाला बहळ शिपारस करा-वा. आमी एकदां आंत गुसले ह्मणजे दुसरीच गायनं त्येंचा मुली-ला शिकवितो.

**प्रताप०**–ठीक आहे. बोलणें तर उत्तम बोललास. ( आपल्याशीं ) या खुळ्याला आतां काय सांगावें ? तिचें मन वळविण्याकरितां

इतका वेळ तसें वेडेंविद्रें बोलत होता; आतां गवयी बनणार ! पण,अशा वेड्यांना अनुभवासारखें दुसरें औषध नाहीं. उपदेश तर त्यांना विषासारखा कडू लागतो. ठेंच लागली म्हणजे आपो-आप शुद्धीवर येईल. असो; त्याच्याविषयीं राहूं दे. या थोरल्या मुलीचें वर्णन ऐकल्यापासून माझ्या जिवाला फार हुरहूर लागून राहिली आहे. मिळवीन तर अशीच बायको मिळवीन. तिचा हा आडदांडपणा केवळ वरची खडबडीत साल आहे. आंत चंदनाच्या गाभ्यासारखा परिमल भरला आहे यांत संशय नाहीं. पाहूं तर खरी नशिबाची परीक्षा. ती कशीही असली तरी माझ्यापुढें —

**राणोजी०**—मित्रा, इतकी चूर्णिका कसली करतो आहेस ? ( रागानें ) तुला जर माझें कर्तृत्व कर्तव्य नसेल तर 'गम्यतां पुनरागमनायच.' असले रडत स्वार घोड्यावर राव मला नकोत.

**प्रताप०**—मूर्खच आहेस. मीं कधीं प्रसंगीं स्नेह्याला मदत करावयाला चुकलों आहे ?

**पिल्या**—( एकीकडे ) कोनाला साळसूदपना होवा असला तर येंच्यापाशीं विकत घ्यावा. त्या म्हाताऱ्याला फसवायची हिकमत कशी काडलीया यानं ? आन् ह्यें समदं कशापायीं ? तर आवा होवी आवा. आवाच्या पायीं मरद चांगल्याच वाईट कस व्हत्यात ते ह्ये असच बगा. पन ह्यो रानुजी या कामांत चांगला हिसका खानार यांत संशव न्हाइ. याच्याकड ती पोरगी ढुंकूनबी बगल का ? याला ती भाळल तर मलाबी का न्हाइ माळ घालनार ?

**रणधीरराव व रंभाजीराव** ( पुराणिकाचा वेष घेतलेला ) **बोलत येतात.**

अर ह्ये कोन हैती ? धनीसाब, तकड बगा तर खरं. अर तुमी कोनर ? का, जाब का न्हाइ देत ? मस्ती आलीथा काय ?

**राणोजी०**—पिल्या, चूप ! अरे कमळेला उपटूं पाहणारा हा माझा उपस्पर्धी. प्रतापराव जरा एका बाजूला उभे राहून हा कोणत्या मसलतींत आहे तें पाहूं या.

**पिल्या**—आं ! ही स्वारी का आतां इस्काच्या पायीं बिमार

हाय? तोंडांत दात तरी -हायल हैत का ! पन् ऐट बगा किती हाय ती. छाती काढून कबुतरावानी कसा चालतुया ? ( तिघही एका बाजूला होतात. )

**रणधीर०**—काय योगायोग आहे पहा ! मला आपलीच जरूर होती. आपलें नांव काय ह्मटलें ?

**रंभाजी०**—मला विद्याधरशास्त्री पुराणीक ह्मणतात. वाराणशी क्षेत्रीं सुप्रसिद्ध विद्यारण्याचार्य महामहोपाध्याय वास करतात त्यांच्यापाशीं एक तपपर्यंत शास्त्राध्ययन करून त्यांचा आशीर्वाद व न्यायतर्कालंकार चूडामणी ही पदवी घेऊन आलों. बाकीची हकीकत रामशास्त्रीबुवांनीं आपल्या पत्रीं विदित केलीच आहे.

**रणधीर०**—रामशास्त्रीबुवांचा आमच्या घराण्याशीं पिढीजाद संबंध आहे, तेव्हां आतां जास्त चवकशी करण्याची जरूर नाहीं. हें पहा, मी तुह्मांला केशरकस्तुरी वगैरेंनीं सुगंधित केलेल्या पोथ्या देईन. वस्तुतः हा सुगंध माझ्या प्रियेच्या श्वासोच्छ्वासाच्या घमघमाटापुढें कांहींच नाहीं ह्मणा. या पोथ्यांना तिच्या त्या पवित्र हातांचा स्पर्श झाला ह्मणजे मी आपल्याला धन्यधन्य मानीन. तिला तुह्मीं जें कांहीं ऐकवाल, त्यांत मुख्यतः मदनप्रतापाचा गौरव पाहिजे. राधाकृष्णाचें मनोहारी चरित्र तिच्या मनांत असें कांहीं ठसवा, कीं आपल्यावर लुब्ध असणाऱ्या या रणधीररावाशीं आपलीही केव्हां जोड होईल असें तिला झालें पाहिजे. सांगा पाहूं कोणकोणतीं आख्यानें आपण तिला शिकविणार ?

**राणोजी०**—प्रतापराव, बघितलास हा कावा ? बरें आहे म्हणावें. अस्मादिक तिच्यापाशीं तिगस्तामार्फत संधान जुळवूं पहाणार काय ! हा तिस्मारकाखान हें नाजूक काम स्वतःच करणार. असलें काम तिगस्ताच्या हातीं सोंपवून चालत नाहीं.

**पिल्या**—हा थेरडा अक्शी येडा हाय ! हा तरने जान पुरानीक येच्यावद्दल रदबदली करनार व्हय ? तर मंग तो येच्यापुनवी गाडाव असल. ह्यो मदल्यामदिंच लाट मारून पार व्हनार तरच माज नांव पिल्या.

**रंभाजी०**—रावसाहेब, आपण त्याची कांहीं काळजी करूं

नका. मला सारें समजलें. मी तें काम असें कांहीं करतों, कीं जणूं कांहीं तें माझेंच आहे. आपण स्वतः जरी तें काम करावयाला गेलां तरी माझ्यासारखें वठावयाचें नाहीं.

**रणधीर०**—होय, रास्त आहे. माझ्या अंगीं तुमच्या इतकें पांडित्य कोठें आहे ?

**पिल्या**—आन तुला गाडवाइतकी तरी अक्कल हाय का ?

**प्रताप०**—पिल्या, हुश्.

**राणोजी०**—( पुढें होऊन ) रामराम, रणधीरराव !

**रणधीर०**—रामराम. भले भेटलां. आमची स्वारी यावेळीं फार खुषींत कां आहे सांगा पाहूं. नाहींच ध्यानांत यावयाचें. ( **रंभाजीरावाकडे** बोट दाखवून ) ही पहा त्या देवीला देण्यासाठीं भेट मिळविली आहे. हे पुराणीकबोवा इतके तरुण दिसतात, पण मोठे पंडित आहेत.

**राणोजी०**—एकूण अस्मादिक अग्निसरत्व मारणार तर मग ! अस्मादिक आपला अश्व आमच्या पृष्ठभागीं ढकलणार ! बरें आहे बुवा. पण हे पाहिलेत का कोण आहेत ते. अज्ञान करा पाहूं.

**रणधीर०**-ऊंः, कमळेला मागणी करणारे असतील कोणी तरी आपल्यासारखेच. आह्मांला आतां असल्यांची भीति वाटत नाहीं म्हटलें.

**राणोजी०**-तुमचा तर्क अगदींच चुकला. मी कांहीं आपल्या पायांनीं आपल्याच हातावर धोंडा पाडून घेणारा मूर्खचिंतामणी नाहीं. हे आले आहेत त्राटिकाबाईला मागणी करावयाला, समजलां !

**रणधीर०**-खरेंच का हे त्या त्राटिकेला मागणी करणार ? आपल्याला नाहीं हें खरें वाटत !

**पिल्या**-( एकीकडे ) ह्या थेरड्याला ती तरनीज्ञान फटाकडी आपल्याला भाळल हें मातुर अक्षी खरं वाटतं न्हाइ !

**प्रताप०**-कां, आपल्याला अशी शंका कां येते ! ती भांडखोर, कजाग, द्वाड आहे इतकेंचना ! ऊंः, त्यांत काय आहे !

**रणधीर०**-( हंसून ) छे छेः, त्यांत कांहींच नाहीं. जरा थोडी भीति आहे इतकेंच. राव, आपण कोठचे राहणारे ?

**रणोजी०**-तो सारा अट्टाहास्य कथाभाग पश्चात् कळवीन.

**प्रताप०**-मी कोठचा का असेना ! त्याच्याशीं आपल्याला काय करावयाचें आहे? माझ्या मनांतून तिच्याशीं लग्न लावून देवाच्या दयेनं उदंड आयुष्य आणि यथेच्छ सुख भोगावें असें आहे, एवढें आपल्याला बस्स झालें.

**रणधीर०**-देव करो आणि आपली इच्छा सफल होवो; पण मला तर मोठी भीति वाटते कीं, आपल्याला सुख मिळावयाचें तर राहो बाजूला, पण असलेलें आयुष्य देखील कमी व्हावयाचें. खरोखरीच का या बोलभांड पिसाळ भाटीशीं आपण लग्न लावणार?

**प्रताप०**-तुह्मी तरी फारच संशयखोर दिसतां ! अहो, 'मला जगावयाचें आहे का ? असेंच का विचाराना. थोडासा गडगडाट ऐकून भिणारा हा गृहस्थ नाहीं. सिंहाची भयंकर गंभीर गर्जना, तुफान दर्याच्या खवळलेल्या लाटांचें अकांडतांडव, चिरडीस गेलेल्या सैन्यांच्या रणयज्ञांतील भयंकर आरोळ्या, शेंकडों प्राण्यांना यमपुरी दाखविणाऱ्या तोफांचा कानटाळ्या बसवून टाकणारा धूमधडाका, यांना ज्यानें दाद दिली नाहीं तो एका बायकोच्या टकळीला भिऊन पळेल ?

**पिल्या**-( एकीकडे ) आमच्या धनीसाबांच्या लडाइच्या बाता ऐकूनच त्या ह्मातारबुवाच हातपाय लटपटू लागल.

**रणधीर०**-बोलण्यांत तर खूप मारून नेतां, पण बोलण्याप्रमाणें कृति मात्र झाली पाहिजे. मी खचित सांगतों यांनीं कितीही लांबलांब बाता झोकल्या तरी यांची आणि त्या त्राटिकेची गांठ मात्र पडूं द्या कीं यांना दे माय धरणी ठाय होईल.

**रणोजी०**-( घाबरून ) आं, ती आली कीं काय.! संभाळरे प्रतापराव ! ( त्याच्यामागें लपतो. )

**प्रताप०**-( हंसून ) अरे वेड्या, इतका भितोस का ? शाबास त्राटिके, तुझ्यांत कांहीं पाणी दिसतें आहे खरें. बरें, राव या कोरड्या गप्पा नकोत. पैज मारतां का ? चला पांचशें मोहोरांची पैज.

**रणधीर०**-ठरली. तुह्मीं जर जिंकली तर पांचशें काय हजार मोहोरीं द्यावयाला मी तयार आहें.

**पिल्या**-( एकीकडे ) ह्यो येडा या कामीं आपली थैलीबी सैल करून घेनार !

थाटाचा पोषाख केलेला **येसाजी** व **तान्या** येतात.

**येसाजी**-रामराम ! धनाजीरावांच्या घराला जावयाला अगदीं जवळची वाट कोणची ती दाखवाल तर फार उपकार होतील.

**पिल्या**-( एकीकडे ) ह्यो एक आला जनू नवा उल्लू. मला वाटतं आतां हतं या गावांतल्या संमद्या येड्यांचा बाजार लई गमतीचा जमनार.

**रणधीर**०-अहो आपल्याला कशाला त्या घराची वाट पाहिजे. आपण जर तिच्याविषयीं —

**येसाजी**-तिच्याविषयीं असो नाहींतर त्याच्याविषयीं असो ! आपल्याला काय त्याचें ? पण चला आपण जाऊं. या रिकामटेकड्या गांवकुटाळ लोकांशीं बोलत बसावयाला आपल्याला नाहीं वेळ.

**रंभाजी**०-( एकीकडे ) शाबास, येसाजी, आरंभ तर ठीक केला आहेस.

**रणधीर**०-अहो बडे गृहस्थ, खूपच ऐट आणली आहेत ! हें पहा, धनाजीरावांच्या धाकट्या मुलीवर आपला डोळा आहे वाटतें ?

**येसाजी**-बरें मग, त्याचें काय ?

**रणधीर**०-आपण आल्या वाटेनें मुकाट्यानें परत जाल तर त्याचें कांहीं नाहीं. ( अस्तन्या वरतीं सारून मिशीला पीळ घालतो. )

**येसाजी**-आपण विक्षिप्तच दिसतां. रस्ता आपल्याला कोणीं आंदण दिला आहे वाटतें ?

**रणधीर**०-( डोळे वटारून व ओरडून ) रस्ता मोकळा असेल पण ती मोकळी नाहीं, समजलां ?

**पिल्या**-( एकीकडे ) बगा म्हाताऱ्याचा दम केवडा हाय तो. ह्योच जर तरना असता तर संमद्यांना खाऊन टाकलं असतं जनू !

**येसाजी**-ती मोकळी नाहीं ह्मणतां ? कां बरें ? तिचें लग्न नाहींना झालें ?

**रणधीर०**-लग्न नाहीं झालें अजून. पण अस्मादिकांचें ह्मणजे या रणधीररावांचें तें प्रीतिपात्र आहे व हान्व पठ्ठ्या तिच्याशीं लग्न लावणार, समजलां? मुकाट्यानें परत जा. आपल्याला तारुण्याची फार गुरमी असेल, पण या जिवानें इतके दिवस तालमींत घालविले ते उगीच नाहींत ह्मटलें. असेल छाती तर चला आखाड्यांत. तेथें दाखवतां तुह्मांला हात. जो जिंकील त्याची कमळा. ( पविऱ्यांत उभा राहतो )

**येसाजी**-( हंसून ) अब्बबब, केवढी ऐट ! रावसाहेब, आपल्या डुरकावण्याला भिणारा हा गृहस्थ नाहीं. आपल्यासारखीं शेंकडों मुरकुटें जरी वाटेंत आडवीं आलीं तरी हा गृहस्थ त्यांनी नुसता हात हालवून अश्शीं बाजूला सारून पुढें सरणार. ( **रणधीररावाला** बाजूला सारून पुढें जाऊं लागतो. )

**रंभाजी०**—रणधीरराव, जाऊं द्या त्यांना. ही तरुण मंडळी हट्टी, मागें पुढें न पाहणारी असते. हे धडकीसरसे पुढें जावयाचेच, पण अखेरीस कशावर तरी आपटून यांचा कपाळमोक्ष व्हावयाचा.

**प्रताप०**- ( **येसाजीस** ) अहो, जरा थांबा. धनाजीरावाच्या थोरल्या मुलीचें लग्न झाल्याशिवाय धाकटीचें व्हावयाचें नाहीं हें आपण ऐकलेंच असेल ?

**येसाजी**—हो, पण त्या थोरलीशीं लग्न कोण लावणार ?

**रणधीर०**—अहो, हिडिंबीशीं लग्न लावावयाला भीमदादाशिवाय दुसरा कोण मिळणार ? हे प्रतापरावच तें साहसाचें व हिमतीचें काम करीन ह्मणतात.

**येसाजी**-तर मग आमचें सर्वांचें दैव तुमच्या हातीं आहे ह्मणावयाचें.

**राणोजी०**-आणि ह्मणूनच आह्मी ह्मणतों कीं आपण सर्वांनीं मिळून यांचें उच्छिष्ट चिंतन केलें पाहिजे.

**येसाजी**-वा; फार उत्तम ! आपली ओळख झाली हा एक अलभ्यलाभच झाला ह्मणावयाचा. तर मग आज संध्याकाळीं आमच्या घरीं या. आपली सर्वांची दोस्ती झालीच पाहिजे. तेथें खाऊं, पिऊं, मजा करूं.

प्रताप०–पण अगोदर आंत चला. राणोजी, चला या सार्‍यांना आंत घेऊन. ओळख झाली आहे, तेव्हां पानसुपारी घेऊन जावयाला ते नाकबूल होणार नाहींत.

[ सर्व जातात.

# अंक दुसरा.



## प्रवेश १.–धनाजीरावाचें घर.

त्राटिका आणि कमळा येतात.

कमळा–ताई, सोड माझे हात. मला अशी कां छळतेस? मीं काय तुझें घोडें मारलें आहे? नकटें व्हावें पण धाकटें होऊं नये ह्मणतात, तें किनई खोटें नाहीं—

त्राटिका–ह्मणजे तूं धाकटी आणि मी नकटी होय? तुझें नाक लागलें आहे फार फार वर यावयाला, नाहीं? हें बघ आतां तें खालीं बसवितें. ( तिचें नाक उपटते. )

कमळा–ह-ह-हाय्! ही कोण मेली थट्टा! ताई, माझ्यावर कां तुझा इतका राग? नको माझे हात इतके जोरानें धरूं. हें पहा रक्त देखील निघालें. बाबांनीं तुझ्यासाठीं मला घरांत कोंडून ठेवली, त्याबद्दल मीं तुला चकारशब्द तरी बोललें? तुला काय पाहिजे तें मला नीटपणें सांग. अशी गांजतेस कां मला!

त्राटिका–अललल, किती पण गांजून गांजून वाळली हो! हाडें हाडें गेलीं आणि मास मास राहिलें. तरी ह्मटलें आमच्या बाईसाहेब अशा रोड कशा झाल्या! आत्तां समजलें मला. हे पाहिलें का गाल किती सुकून गेले ते. ( तिचे गाल चिमटते. )

कमळा–बाबा एकदां माझें लग्न करून टाकतील तर बरें, ह्मणजे या जाचांतून तरी सुटेन,

त्राटिका–किती निलाजरी आहेसग तूं! तुला लग्नाची थंचा-

इतं इतक्यांत कशाला पाहिजे ? कोणाचा हातावित धरून उठून जावयाचा तर नाहींना विचार ? लाडूबाई, बाबांची आपल्यावर किती जरी मर्जी असली तरी माझें लग्न झाल्याशिवाय तुझें कोठें होतें आहे ! माझा तर निश्चय आहे लग्न करावयाचेंच नाहीं ह्मणून.

**कमळा**-ताई, मी कांहीं लग्नासाठीं उतावळी झालें नाहीं इतकी. आपलेंच कसें तें होऊं द्या ह्मणजे झालें. द्राक्षें मिळत नाहींतशीं झालीं ह्मणजे तीं आंबट व्हावयाचींच.

**शाटिका**-लागली का जीभ वळवळायला ? फाजील नाहीं तर. खाऊ पाहिजे असेल नाहीं खाऊ ? ( तिच्या पाठींत धपाटे घालते. ) हां, खबरदार ! कांहीं नको रडावयाला. सोंगें करावयाला पण कशीं खाशीं येतात. काय मानभावीपणा ! जसें कांहीं कोणी म्हणेल हिला झोडपली हो. चुरुचुरू बोलावयाला पाहिजे आणि बक्षीस मात्र नको ! हं-गप्प ! असें. ( तिचें तोंड दाबून धरिते. ) आतां सांग मी विचारतें त्याचें उत्तर. तुला मागणी करावयाला आले आहेत यांतला तुला कोण आवडतो बरें ?

**कमळा**-खरेंच सांगूं ताई ! मला त्यांतला एकही आवडत नाहीं. मेले सगळे माझ्या रूपासाठीं आणि बाबांच्या पैशासाठीं पुढें पुढें करावयाला तयार. देवानें हें रूप दिलें नसतें आणि एखाद्या गरीबाच्या पोटीं मला घातली असती तर किती बरें झालें असतें !

**शाटिका**-अगगई ! जसें कांहीं खरेंच. मला हे सारे ढंग समजतात हो. अग चोरटे, माझ्यापासून लपवून ठेवणार तूं ? नाहींग तुला तो रणधीरराव आवडत ? काय पण तुला पाहिलें कीं त्याला होतें ! चांगला वयस्क आहे. माझ्या छकुलीला अगदीं जीव कीं प्राण करील. तोच तुला आवडतोना ?. हं बोल लवकर. ( तिचे दोन्ही हात एका हातानें घट्ट धरून दुसऱ्या हातानें तोंड वरतीं उचलते. )

**कमळा**-इस्स-आईग ! ताई, सोड, सोड माझे हात. अगदीं कळ लागली पहा. मी खरें सांगतें, मला किनई ते मुळींच आवडत नाहींत. तुझ्या गळ्याची शपथ. तुला आवडत असेल तर तूं खुशाल त्यांच्याशीं लग्न लाव. ते केवढे, मी केवढी. तुझाच तो मान !

**शाटिका**-हं, पुनः आलीस आपल्या वळणावर. आणखी खाऊ

पाहिजे होय? ते रणधीरराव नकोत तर तो राणोजी पाहिजे असेल ! काय मुरडतो, कसा मुरकतो, नटवेपणा तरी किती भरला आहे ! खचित तोच तुला आवडत असावा. बरा आपला तसा नवरा मिळाला तर त्याला कान धरून हवा तसा वळवावा. ही स्वारी आपल्या हातीं येऊन त्यांच्या घरचा कारभार आपण पाहूं लागला ह्मणजे होईल का आमची आठवण ?

**कमळा**-ताई, तूं इतकें टोंचून बोलते आहेस, तेव्हां तो तुझ्याच डोळ्यांत भरला असावा. तुला लोकांचे कान धरावयाची भारी हौस आहे. तेव्हां तूंच त्याच्याशीं लग्न लाव, आणि कान धरून नेहमीं बैस.

**त्राटिका**-मला कान धरावयाची हौस आहे का ? बरें तर मग, घरतें हो कान. ( तिचे कान जोरानें उपटते व तिला मारते. )

**धनाजीराव** येतो.

**धनाजी**०-आनंदी, हें काय ? तुझा फाजीलपणा फारच वाढत चालला. सोड तिला. कमळे, तुला हजारदां सांगितलें, कीं तिच्या वाऱ्यासही उभी राहूं नको. जा आंत आणि आपलें तें शिवणकाम घेऊन बैस. अग राक्षसी, कां तूं तिला अशी छळतेस ? ती कधीं एक शब्द वाकडी बोलली आहे का ?

**त्राटिका**-आपली लाडकी लेक आहे, तेव्हां तिचें कांहीं आपल्याला वाईट दिसावयाचेंच नाहीं. एकटी असली ह्मणजे जीभ कशी चुरुचुरू चालते ती ऐकावयाची होती. आपल्यासमोर मात्र अगदीं गरीब, एक अक्षर काढावयाची नाहीं. आणि तें तरी कां तर मुद्दाम मीच एकटी फार बोलभांड आहे असें दाखविण्याकरितां. पक्की चोर आहे. तिची खोड मोडल्याशिवाय कध्धीं रहावयाची नाहीं. ( कमळेच्या मागें जाऊं लागते. )

**धनाजी**०-हं, खबरदार ! कमळे, तूं जा अगोदर आंत आणि मावशीजवळ बैस. [ **कमळा जाते.**

**त्राटिका**-अस्सें अस्सें ! लाडक्या लेकीची किती काळजी आहे महा ! सारें प्रेम तिच्यांवर! जशी मी कांहीं आपली लेकच नव्हे !

तिच्चीं लुगडीं धुवावीं, पोरें खेळवावीं, हेंच काम आपण माझ्याक-डून करविणार वाटतें ? मीं कध्धीं नाहीं हें सोसावयाची. अश्शी जाऊन रडत बसेन. अन्न घेणार नाहीं, पाणी पिणार नाहीं. वेळ सांपडली कीं तिची खोड चांगली मोडीन तरचं माझें नांव त्राटिका.

[ पाय आपटीत निघून जाते.

**धनाजी०**–देवा, सोडीव मला या त्रासांतून लवकर. सुखानें अन्न खाऊं देत नाहीं घरांत. अरे, पण ही मंडळी कोण आली ?

**रणधीरराव**, ( पुराणिकाचा वेष घेतलेला व काखेंत पोथ्या घेतलेला ) **रंभाजीराव**, **प्रतापराव**, ( हातांत सतार घेतलेला, मद्रासी गवयी बनलेला ) **राणोजीराव** आणि **येसाजी** येतात.

**रणधीर०**–रामराम, धनाजीराव !

**धनाजी०**–रामराम, रामराम. तब्येती ठीक आहेतना ?

**प्रताप०**–हें पहा, धनाजीराव, मला बोलण्यांत लांबण लावाव-याचा मोठा कंटाळा आहे. आपल्याला एक आनंदी नांवाची सुं-दर आणि सद्गुणी मुलगी आहेना ?

**धनाजी०**–हो. त्या नांवाची एक मुलगी आहे खरी.

**प्रताप०**-ठीक आहे. तर मग ती आह्मांला देतां का ?

**रणधीर०**- अहो, जरा दमानें घ्या. ही कोण तुमची विचित्र तऱ्हा. अशी का कोठें मागणी करतात ! कांहीं लोकव्यवहाराप्र-माणें वागलें पाहिजे कीं नाहीं ? आह्मांलाही मागणी करावयाची आहे. लग्नाच्या कामांत अशी हुपटघाई उपयोगी नाहीं. पोक्तप-णानें सारें काम झालें पाहिजे.

**प्रताप०**-रणधीरराव, माफ करा. तुह्मांला त्यांतलें कांहीं कळत नाहीं. मी आहें सरळ धोपटमार्गी गडी.—त्यांतून बाहेरून पोक्त-पणा.आणि साळसूदपणा दाखवून आंतला कावा मला थोडाच साधावयाचा आहे !—रागावूं नका. तुमच्याचविषयीं नाहीं माझें बोलणें. बरें, धनाजीराव, मी विजयपूरचा राहणारा आपल्या

थोरल्या मुलीच्या स्वरूपाची व सद्गुणांची कीर्ति ऐकून येथें आलों. येथें तिच्या अंगचा विनय, तिची चतुराई, तिचें सौजन्य इत्यादि गुणांची वाखाणणी तिला प्रत्यक्ष पाहिलेल्या लोकांच्या तोंडून ऐकिली, तेव्हां तिच्याशीं लग्न लावावें हा निश्चय करून आपल्या येथें आगंतुकीला आलों आहें. येथें ऐकिलें कीं आपण आपल्या मुलींना गाणें शिकविणार आहां तेव्हां भेट ह्मणून हे गृहस्थ ( **राणोजीरावास** पुढें करून ) आणले आहेत. यांचें नांव भूमय्या रायलू. गाण्यांत व सतार वाजविण्यांत फारच वाकब असून सभ्य आहेत.

**रणधीर**०-( आपल्याशीं ) या गवईबोवांवर नजर ठेवावयाला या पुराणीकबोवांना सांगितलें पाहिजे.

**धनाजी**०-हे रायलू सभ्य व पोक्त असून मुलींना शिकवावयाला लायख दिसतात. त्यांना आपण आणलें हे माझ्यावर विशेष उपकार झाले. आतां आपण माझ्या मुलीला मागणी केली यांत आगंतुकी ती कसली? पण माझ्या मुलीचें आणि आपलें पटावयाचें नाहीं, याबद्दल मात्र दिलगिरी वाटते.

**प्रताप**०-असें कां ह्मणतां? माझ्यांत कांहीं खोड आपल्याला दिसते कीं काय? किंवा आपल्याला मुलीचें लग्नच कर्तव्य नाहीं.

**धनाजी**०-दोन्हींही नाहींत. बरें, आपलें नांवगांव?

**प्रताप**०-माझें नांव प्रतापराव. वडील विश्वासराव विजयपूरकर. त्यांचें नांव तर सगळीकडे महशूर आहे. ते नुकतेच वारले. त्यांच्या संपत्तीचा मी एकटाच वारस आहें.

**धनाजी**०-काय, विश्वासराव वारले ह्मणतां? फार वाईट गोष्ट झाली. त्यांनीं मोठा लौकिक संपादिला होता. त्यांचे तुह्मी चिरंजीव. तर मग तुमच्या या भेटीचा मोठाच लाभ ह्मणावयाचा.

**रणधीर**०-प्रतापराव, आतां आपली कथा जरा आटपा. आह्मांला बोलावयाला कांहीं सवड द्याल कीं नाहीं? तुमचा हा झपाटा मोठा कठिण बोवा

**प्रताप**०-मला हाततोंड बांधून बसण्याचा मोठा कंटाळा आहे

आणि असल्या झपाट्याखेरीज मोठमोठीं कामें हातून होत नाहींत, समजलां! मग करें काय, धनाजीराव?

**रणधीर०**-अहोराव, इतकी घाई नका करूं. उद्यांचें मरण आज ओढून घेणें हें कांहीं शहाणपणाचें लक्षण समजत नाहींत. इतकी घाई करून आपण मिळविणार काय हें अजून आपल्याला कळलें नाहीं, ह्मणूनच या साऱ्या गमजा आहेत. धनाजीराव, ही पहा माझी भेट. ( **रंभाजीरावाला** पुढें करतो. ) हे गृहस्थ मोठे विद्वान् आहेत. पुराण सांगण्यांत तर यांचा हात धरणारा कोणी नाहीं.

**धनाजी०**-रणधीरराव, तुह्मी माझे जुने दोस्त आहांत, तेव्हां मेहेरबानी केलीत असें ह्मणण्याची जरूर नाहीं.

**रणधीर०**-कसची, कसची! माझ्या हृदयस्वामिनीची ही अल्पसेवा आहे!

**धनाजी०**-( **येसाजीला** ) आपण येथचे दिसत नाहीं. आपलें येणें कां झालें?

**येसाजी**-मी या गांवांत परकी आहें खरा. आपल्या धाकट्या कन्येच्या गुणांवर लुब्ध होऊन मी तिला मागणी करण्याकरितां आलों आहें. तसेंच माझी ही एक भेट ह्मणून कुशल कारागिरानें बनविलेली ही सतार आपल्या मुलीकरितां आपण स्वीकारावी. ती मीं अगोदरच या अय्यांपाशीं दिली आहे.

**धनाजी०**-( सतार घेऊन ) हें यावर सोनेरी अक्षरांचें कोरलेलें नांव-रंभाजीराव-आपलेंच वाटतें?

**येसाजी**-होय. मी कुंडिनपूरच्या शंभूसिंगजींचा मुलगा.

**धनाजी०**-शंभूसिंगजींचें नांव कोणीं ऐकलें नाहीं? आपल्या भेटीनें मला फारच आनंद झाला. या निमित्तानें तरी आपण माझे घरीं आला. अय्या, घ्या ही सतार. पुराणीकबोवा, चला. आपली आणि आपल्या श्रोत्यांची लगेच गांठ घालून देतों. कोण आहेरे तिकडे? ( गडी आंतून 'जी' ह्मणतो. ) अरे, यांना घेऊन जा आणि मावशींना सांग, कीं हे पुराणीक आणि हे गवयी आले आहेत. सांगितल्याप्रमाणें व्यवस्था करा.

[ दोघे आंत जातात.

आपल्याला फुरसत असली तर चला आमच्या बागेंत. येथें जरा फिरूं इकडे तिकडे. आज आपण सर्वजण आमच्याच येथें भोजनाला रहा. आज आपला पंक्तिलाभ झाला तर मला फार आनंद होईल. घर आपलें आहे, मनांत बिलकुल संकोच धरूं नका.

**येसाजी**–मला माफ करा. मला अजून बिऱ्हाडाची व्यवस्था वगैरे लावावयाची आहे, तसेंच वडिलांच्या ओळखीच्या मंडळीच्या भेटी घ्यावयाच्या आहेत, मला रजा द्या.

**धनाजी०**–बरें तर, मग नाइलाज आहे. [**येसाजी** जातो.

**प्रताप०**–धनाजीराव, माझ्या मागें कामें फार. रोजरोज तुमच्या येथें ऋणकऱ्यासारखे खेटे घालण्याची दगदग माझ्याच्यानें होणार नाहीं. आपल्याला माझ्याशीं सोयरीक करावयाची आहे किंवा नाहीं, तसेंच हुंड्यापांड्याबद्दल आपलें जें कांहीं म्हणणें असेल तेंही सांगून टाका. स्पष्ट विचारलें तसा स्पष्ट जबाब येऊं द्या. मला स्वतःला आढेवेढे घेतां येत नाहींत आणि दुसऱ्यानें घेतलेले खपत नाहींत.

**धनाजी०**–ठीक आहे. वरदक्षणा वीस हजार मोहरा मी देईन. माझ्या मागें माझ्या निम्म्या जिंदगीची मालकीण तीच होणार. पण अगोदर –

**प्रताप०**–तो ' पण ' एकला कीं माझें माथें फिरून जातें. मी असल्या पणाला जुमानणारा गृहस्थ नाहीं.

**धनाजी०**–अहो, पण मुख्य गोष्ट तिचें तुमचें पटतें का हें पहावयाचेंच आहे. ती माझी मुलगी आहे खरी, पण तिचा स्वभाव तऱ्हेवाईक आहे ह्मणून म्हणतों तिनें आपल्याला पतकरलें तर माझा रुकार उपयोगी. तिच्या मर्जीबाहेर जाणें मुष्किलीचें आहे.

**प्रताप०**–उंः, त्याची नको आपल्याला काळजी ! लग्नापूर्वी तिची मनधरणी करीत बसण्याचें कारण काय ? आणि तसें करावयाला वेळ आहे कोणाला ? लग्न होऊन तिची गांठ तर पडूं द्या कीं तिला नरम आणलीच समजा. एखाद्या नेभळ्या पोराप्रमाणें आर्जवें करून मनधरणी करणारा मी नाहीं. तिचा तो ताठा माझ्या सोसाट्याच्या हल्ल्यांपुढें टिकावयाचा नाहीं.

**रणधीर०**-ऐट तर खूप आणली आहे; पण माझी खात्री आहे कीं माझ्या पणाच्या हजार मोहरा कांहीं माझ्या थैलींतून जात नाहींत.

**धनाजी०**-बरें आहे, प्रतापराव, पहा तर मग आपल्या नशि-बाची परीक्षा. माझी मुलगी जरा विचित्र आहे. तिला भीडमुरवत बिलकुल नाहीं. ह्मणून ह्मणतों संभाळा!

**प्रताप०**-पुनः पुनः काय सांगतांहो. वारा कितीही मोठ्या जो-रानें वाहिला ह्मणून पर्वत कांहीं डळमळत नाहीं.

**राणोजी** हातांत मोडलेली सतार व डोक्यांतून रक्त वाहतें आहे असा धापा टाकीत जातांना दिसतो.

**धनाजी०**-अय्या! असें धावऱ्या धावऱ्या कोठें चाललां? हें रक्त कशानें निघालें? कोठें पडलेबिडलेत कीं काय?

**राणोजी०**-स्वामी, तो हकीकत आमाला विचारूं नका. आमी आमचे नशिबांत पुटले. ते राछसी आला वाटतो! व्यंकटेशा, आमचे रछा कर. आमी जाते स्वामी.

**प्रताप०**-असें हो काय करतां? इतक्या कळकळीनें हे तुह्मांला हकीकत विचारीत आहेत आणि तुह्मी तें कांहीं न सांगतां जातों ह्मणतां?

**राणोजी०**-स्वामी, आमी काय सांगावा! हा रक्त निगाले तें आमाला येंचा दोड्ड मुलगीनें गुरुदछिना दिले. आमचा काम झाले. आमी जाते आतां.

**रणधीर०**-प्रतापराव, पाहिलात हा प्रताप! मृत्यूच्या दाढेंत शिरण्यापेक्षां आपणच आणलेल्या या गवयीबोवांचा कित्ता गिर-वून आपण येथून पाय काढावा, हें बरें दिसतें.

**प्रताप०**-( त्याच्याकडे तिरस्कारानें पहात ) उंः!

**धनाजी०**-अय्या, काय हकीकत झाली ती नीटपणें सांगाल तर खरी. आनंदीनें का हें केलें?

**राणोजी०**-ते आनंदी कसचा-डाकिनी—छूर्पनका ते!—आ-मी आंत गेले आणि वीणा गेऊन लावायला लागले. ते मणाले आमुचा हातांत या. आमी मणाले ते तुमाला लावता यायचा नाइ.

तुमी अग्र्य आहेत. तेनी वीणा घेतले आणि आमचे मस्तकांत गातले. जकम जाले, रक्त निघाला.

**रणधीर०**-प्रतापराव, जरा छातीला हात लावून पाहूं का आपल्या ? पाहिजे असला तर आह्मी आपला पण मागें घेतों.

**प्रताप०**-आपलीच छाती अगोदर दडपून गेलीशी दिसते आहे. हवें असल्यास आपण घरीं जावें. म्हणजे जरा धीर येईल तुह्मांला, आणि शिवाय पण हरल्यावर थैली द्यावी लागणार ती भरून ठेवावयाला फुरसूत सांपडेल. जातांना गवयीबोवांना घेऊन जा. आपली जोडी खाशी शोभेल ! हे यल्लमाचे पहिलवान् कोठून आले ह्मणून सारा गांव आपल्याकडे पहात राहील !

**राणोजी०**-( आपल्याशीं ) अरे नीचा प्रतापरावा ! मी तुझा स्नेही, माझें सारें इंगित तुला ठाऊक, असें असून माझी अशी थट्टा करतोस काय ? बरें आहे, ती घोरपड आपल्या गळ्यांत पडली ह्मणजे कोण हसतें तें पाहूं !

**धनाजी०**-प्रतापराव, रणधीरराव, तुमचें हें भांडण राहूं द्या घटकाभर. अय्यांची हकीकत ऐकून घेऊन मग त्याबद्दलचा बंदोबस्त केला पाहिजे. अय्या, पुढें काय झालें सांगा.

**राणोजी०**-स्वामी, आमी गरीब अंत हे आमचा चेष्टा करतात देव पाहून गेतो. आमी तेना मणाले ते वी वीणाचा कुंटी असा पिळावा. तो तेनी आमची कान पिळले, आमाला शिव्या दिले, कूप मारले. अय्यौय्यो. सारा अंगांत दुःक बरले. आमाला गाडव मणाले, आमाला पाजी मणाले, आमाला बागुबाई मणाले. आमी जीव गेऊन पळाले. ( **प्रतापरावा**कडे रागानें पहात ) आमी कचित् सांगते ते आपले गंडाला काऊन टाकतील.

**रणधीर०**-अय्या, आपला शेवटला टोला पण खूप छानदार लागला असावा. कां, प्रतापराव असेंचना ?

**प्रताप०**-कोण, हे गवयीबोवा का टोला देणार ? 'ते आमाला बागुबाई मणाले. आह्मी पळून आले !' वाः काय पण टोला देणारे खंबीर गडी ! पण तें जाऊं द्या. ही हकीकत ऐकल्यापासून तर आपला तिच्याशींच लग्न करण्याचा निश्चय कायम झाला.

माझ्यासारख्या आडदांड शिपाईगड्याला असलीच बायको पाहिजे. एखादी नाजूक पुतळी घेऊन तिला देव्हाऱ्यांत पुजून ठेवणारा मी नव्हे, समजलांत. बाबासाहेब, आतां उशीर कां ? तिची माझी गांठ घालून देतांना ? तिला केव्हां पाहीन, तिच्याशीं केव्हां बोलेन, असें मला झालें आहे.

**धनाजी**०-अय्या, तुह्मी आतां जा घरीं. मी याचा बंदोबस्त करतों. उद्यां मला भेटा. [ **राणोजीराव** जातो.

प्रतापराव, आनंदीला इतक्यांतच इकडे पाठवून देतों. आह्मी आसपास असतोंच. तिचा रुकार मिळाला कीं आह्मांला हांक मारा.

[ आंत जातो.

**रणधीर**०-आतांचा हा प्रसंग फारच बहारीचा होईल; पण तो माझ्यानें पाहवणार नाहीं. रामराम ! हा रामराम शेवटचा न होवो, अशी देवाची प्रार्थना करतों. देवाला आपल्यासाठीं नवस करतों, कीं त्यानें आपल्याला धडपणीं या प्रसंगांतून पार पाडावें.

**प्रताप**०-कशाला इतकी तसदी घेतां ? आपल्या मोहोरा वांचाव्या ह्मणून पाहिजे तर देवाजवळ मागणें मागा.

[ **रणधीरराव** जातो.

आतां परीक्षेची वेळ आली खरी. हें प्रकरण जरा जड दिसतें. आतांपर्यंत मीं मोठमोठ्या आढ्यतेच्या थापा मारल्या खऱ्या, पण मनांत थोडी भीति वाटते. मग काय नाउमेद होऊन हातीं धरलेलें काम भागूबाईसारखें मध्येंच टाकून पळून जावयाचें ? छेः, आपल्या हातून असें कधींच व्हावयाचें नाहीं. आजपर्यंत मीं मोठमोठ्या जीवावरच्या प्रसंगांतून पार पडलों, ऐटबाज शत्रूंना धूळ खावयाला लावली, — हा सारा लौकिक एका फटकळ तोंडाच्या अवदसेच्या बडबडीला भिऊन गमवावयाचा ? हा प्रताप त्यांतला नाहीं. लौकिकाची गोष्ट राहूं दे, पण अशा प्रकारची बायको जर चांगली निवळली, तर तिच्यासारखी संसारसुखाला व नवऱ्याच्या तब्बेतीला जपणारी दुसरी मिळावयाची नाहीं. हा उद्दामपणा ह्मणजे आंतील जोरदार पाण्याच्या उसळण्यानें वर आलेला फेस आहे. हा कांहीं जन्मभर

टिकावयाचा नाहीं. हा गेला कीं खालीं शुद्ध स्फटिकासारखें निर्मळ पाणी आढळेल. बस्स, काय होईल तें होवो, तिला वश करून घेणारच. अरे, पण ही पहा आलीच. अहाहा, काय हें सौंदर्य, किती मोहक हा बांधा आहे. छे:; असलें रत्न टाकावयाचें ? इतका मी मूर्ख नाहीं. प्रतापा, सावध रहा. सावज तापट आहे. बेफाम होऊन केव्हां अंगावर येईल याचा नेम नाहीं. नजर ठेवून शिकार साध. संभाळ !

**त्राटिका** येते.

( तिच्याकडे पाहत मोठ्यानें ) अहाहाहा, केवढा प्रकाश पडला हा ! खरोखरच आकाशांतील चंद्रच हा खालीं उतरला. ये आनंदी, इकडे ये. तुझ्या वडिलांचा निरोप ऐकून तूं आलीस यावरूनच तूं किती आईबापांची मर्यादा ठेवणारी नम्र मुलगी आहेस हें स्पष्ट होतें.

**त्राटिका**-अस्सें अस्सें ? बाबांनीं मला बागेंत पाठविलें तें याचसाठीं वाटतें ! कोण तरी मानभावीपणा हा. तरी मला वाटलेंच कीं आज बाबासाहेबांचें माझ्यावर इतकें प्रेम कां ? " बाळे आनंदी, बागेंत जाऊन त्या माळ्याला बोलावून सांग, कीं आज मंडळी आली आहे त्यांच्यासाठीं चांगलीं चांगलीं फळें घेऊन ये. तूंच त्याला फळें निवडून दे. तुला परीक्षा चांगली आहे. " बरें आहे बाबासाहेब. याचा वचपा काढीन बरें. अरे ए मूर्खा, तुला धडपणीं परत जावयाचें असेल तर मुकाट्यानें असाच्या असा चालता हो. नाहीं तर या त्राटिकेशीं गांठ आहे, समजलास ?

**प्रताप०**-अग आनंदी, माझी हीच इच्छा आहे कीं तुझी माझी गांठ पडावी व ती जन्माची म्हणून तर मी येथें आलों. तुझी खुषी असल्यावर मग मला आणखी काय पाहिजे, आनंदी !

**त्राटिका**-मेल्या, जन्माची नाहीं पण प्राणाशीं मात्र गांठ पडेल-

**प्रताप०**-एका प्राणाशींच कां ? तूं मला मिळालीस कीं मला माझे पंचप्राणच मिळाले. वा: आनंदी, तुझ्यासारखी धूर्त मुलगी मीं नाहीं बोवा पाहिली कधीं !

**त्राटिका**-हं ! हें पहा, असला चहाटळपणा माझ्या नाहीं हो

कामास पडावयाचा! कोणत्या नांवानें मला तूं हाक मारलीस? आपल्याला ठाऊक नव्हतें माझें नांव तर दुसऱ्या कोणाला विचारून यावयाचें होतें. आणि नुसत्या एकेरी नांवानें हांक मारावयाला लाज नाहीं वाटत? त्यापुढें 'बाई' लावून 'अहो जाहो' ह्मटलें असतेंस तर जीभ झडली असती का तुझी?

**प्रताप०**-काय, त्या नांवापुढें 'बाई' लावून 'अहो जाहो' ह्मणूं? छेः छेः छेः! असा प्रमाद माझ्या हातून झाला तर मला सुळीं देण्याचीच शिक्षा पाहिजे. 'बाई,' 'अहो जाहो,' असें कोणाला ह्मणावयाचें? दहा पोरें झालेल्या, पोक्त दिसणाऱ्या, केस पिकलेल्या, चेहेऱ्यावर सुरकुत्या पडलेल्या, अशा थेरडीच्या नांवापुढें 'बाई' हा शब्द लावलेला शोभेल. तुझ्यासारख्या जिची तारुण्याची कळी नुकतीच उमलली आहे अशा कन्येच्या नांवापुढें 'बाई' हा शब्द लावणाराला मारे कोरड्याखालीं झोडपून काढावा. आनंदी, काय सांगूं तुला? इतरांना तूं कशीही अस, मला तूं आनंदीच. मला तुझें दुसरें तिसरें नांव माहीत नाहीं. तुझा चेहरा आनंदी, तुझें बोलणें आनंदी, तुझें चालणें आनंदी, तुझें मुरडणें आनंदी, तुझें ठुमकणें आनंदी, तुझें मुसमुसणें आनंदी, तुझा नाकझाक आनंदी,-सारांश, तुझ्या या आनंदी शरीरांत नखशिखांत आनंदी आनंदच भरला आहे. आपण तर तुला आनंदीच ह्मणणार.

**त्राटिका**-बस्स, बस्स झाला हा लघळपणा! मला तो बिलकुल खपावयाचा नाहीं. तुला जर मला हांक मारावयाचीच असेल तर त्राटिका या नांवानेंच हांक मार; पण तूं माझें नांव घेऊं नयेस हेंच बरें. नाहीं तर व्यर्थ माझ्या नांवानें नेहमीं हाका मारीत बसावें लागेल.

**प्रताप०**-नेहमीं हांका मारूं! वाः फारच उत्तम! आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन डोळे. मीं नुसती आनंदी या नांवानें हांक मारावयाची परवानगी मागितली आणि तूं तर त्याच्या पलीकडे गेलीस. माझ्या मनांतील हेतु कसा बरोबर ओळखलास. वाः, तूं मला ही परवानगी दिलीस यामुळें माझ्या

मनाला किती आनंद झाला आहे ह्मणून सांगूं ! पहातों आतां दुसरा कोण तुला या एकेरी नांवानें हांक मारतो तो ! चामडीच लोळ-वीन हरामखोराची। खरेंच, मी धन्य झालों, येथपर्यंत आल्याचें सार्थक झालें !

**त्राटिका**–आजपर्यंत फाजील व मूर्ख लोकांच्या मी गोष्टीच ऐकत होतें; पण असा मासला कधींच दृष्टीस पडला नव्हता. कान तेवढे लांब नाहींत, बाकी—

**प्रताप०**–बस्स हेंच तें ! ह्मणूनच तूं माझ्या मनांत भरली आ-हेस ती ! काय विनय, किती शहाणपणा ! तूं मला गाढव ह्मटलें नाहींस एवढ्यानेंच तुझ्या गुणांची मला प्रतीति आली. हीच जर एकादी फटकळ तोंडाची असती तर केव्हांच गाढव ह्मणून मोकळी होती. आणि तूं मला गाढव ह्मटलें असतेंस तरी काय झालें अ-सतें ? तुला पाठीवर घ्यावयाला मिळेल तर मी गाढव काय पण त्याहूनही एकादें हलकट जनावर असलें तर तेंही होईन. अशा प्रकारची छानछबेली कोणत्या गाढवाच्या पाठीवर कधीं बसली आहे ? हुं, आनंदी बघतेस काय ? कर माझी पाठ पवित्र तुझ्या या शरीराच्या स्पर्शानें. ( तिच्या पुढें ओणवा उभा रहातो. )

**त्राटिका**–( त्याच्या पाठींत बुक्क्या मारून ) अरे ठोंब्या, झाली का आतां पवित्र तुझी पाठ ?

**प्रताप०**–अलबत, यांत काय संशय ! आणखी आतांच्या या तुझ्या कृतींतलें मर्महीं पण माझ्या चांगलें लक्ष्यांत येऊन चुकलें अहाहा, किती धूर्तता ही ! केवढें चातुर्य ! हा तुझा दास प्रताप प्र वासाच्या शिणानें अगदीं थकला आहे. हें ओळखून त्याचा तो शिण घालविण्याकरितां त्याची पाठ मुटकलीस ! आणि ती पुन अशा खुबीनें, कीं कोणीं पाहिलें असतें तर त्याला वाटलें असे कीं ही त्याला मारते आहे. अहाहा ! काय पण सुख झालें आहे ह्मणून सांगूं ? लग्नापूर्वी जर तूं इतकी माझी काळजी घेतेस त लग्न झाल्यावर काय काय न करशील ? हीच जर एखादी नाजू कशी बायको केली तर ती म्हणावयाची कीं "इश्श बाई. म नाहीं अशी बटकीसारखी खपावयाची हो. साफ सांगतें. मा-

हात दुखतात. हवें असलें तर घ्या गळ्याकडून रगडून. " हे तुझें गण ओळखूनच तुला आपलीशी करून घ्यावयाचा मीं निश्चय केला आहे.

**त्राटिका**-( रागानें लाल होऊन दांतओंठ खाते, कपाळाला आंठ्या घालते, डोळे वटारून त्याच्या अंगावर जाते. ) मेल्या, तुला लाज, लज्जा, भीड, मर्यादा कांहीं आहे का ? अक्कल कोठें विसरून आलास कोण जाणे !

**प्रताप०**-अहाहा ! असलें हें स्वरूप पाहून माझी अक्कल ठिकाणावर राहिली नाहीं तर त्यांत काय नवल ! काय या वेळेला तुझा चेहेरा मोहक दिसतो आहे ! वाटतें कीं एकदम त्याचें चुंबन घ्यावें. सौम्यपणाची येथें कमाल झाली. एकाद्या कैदाशिणीप्रमाणें कपाळाला आंठ्या घालणें, भिंवया चढविणें, डोळे वटारणें, हातपाय आपटणें, हें तुला शिकवूनही यावयाचें नाहीं. हं, हं ! नको तें नाक वर चढवूं ? तूं तसें केलेंस कीं माझे प्राण व्याकूळ होतात. त्या नाकांत अशी झुपकेदार सरज्याची नथ लटकावून देतों कीं तिच्या वजनानें नाक कधीं वर उडूंच नये.

**त्राटिका**-चोंबडेपणाचा आतां कळस झाला बाई ! इतक्यांतच नकोस मेल्या बाशिंग बांधावयाची तयारी करूं कांहीं. शिंगें काय तीं कमी, बाकी शुद्ध नंदीबैल !

**प्रताप०**-अग, हा तुझ्या मनोहर स्वरूपाचा महिमा. त्याला मोहून जाऊन आमच्यासारखे रंगेल गडी नंदीबैलच बनावयाचे. नंदीबैलाप्रमाणें अगदीं तुझ्या हुकुमांत रहावें हीच माझी इच्छा आहे. तुझ्यासारखी वेंसण घालणारी मिळते आहे कोठें ?

**त्राटिका**-मेल्या, या तुझ्या मुर्दाडपणाबद्दल तुझी गांवांतून धिंडच मिरविली पाहिजे.

**प्रताप०**-मी तरी काय ह्मणतों. तूं बरोबर असून गांवांतून मिरवावें हेंच माझ्या मनांत आहे. मग त्याला धिंड ह्मणा किंवा वरात ह्मणा.

**त्राटिका**-छे बाई ! असा दगड कधींच पाहिला नव्हता.

**प्रताप०**-हो, आहें खरा मी तसा जड, पण तो कोणाला

तुझ्या व माझ्या शत्रूंना. तुला मी तसा नाहीं; कारण अशा नाजूक फुलाशीं संबंध आल्यावर जडपणा कसा राहील?

**त्राटिका**-नाजूकपणाचा मासला अजून पुरेसा नाहीं झाला वाटतें! घे, हा घे आणखी! (त्याच्या तोंडांत मारण्याकरितां हात पुढें करते, तो तोच हात आपल्या हातांत धरतो.)

**प्रताप०**-अहाहा, किती मृदु तरी हात हा! आणि फुलाची उपमा दिली ती अगदीं योग्य! आणखी काय हा सुगंध. छे; आपण तर बोवा यांतला मकरंद चाखल्याशिवाय राहणार नाहीं! (तिचा हात तोंडाजवळ नेतो. ती हिसडा मारून हात सोडविते व परत घेतांना तोंडांत एक चापट मारते.)

**त्राटिका**-मकरंद चाखावयाला पाहिजे होता नाहीं? चांगला चुरचुरीत लागला असेल?

**प्रताप०**-हो, यांत काय संशय! अगदीं चुरचुरीत गोड मिठी बसण्यासारखा!

**त्राटिका**-अरे अंधळ्या, फुलांतला मकरंद गोड वाटला; पण त्याचे काटे पाहिले नाहींस. जपून वाग, नाहीं तर हे काटे तुझ्या अंगाचें रक्त चाखल्याशिवाय राहणार नाहींत.

**प्रताप०**-तूं कितीही रागाचा आविर्भाव दाखविलास तरी तुझ्या मनांतील भाव समजलों! किती खुबीदार अलंकारिक भाषण हें! ये, उशीर लावूं नको. तुझे दांत आणि तुझीं नखें या कांट्यांनीं हें शरीर चित्रविचित्र करून घेण्याचा अधिकार यावा ह्मणून तर मी येथें आलों. त्या कांट्यांनीं या अंगींतलें रक्त निघावें इतकें भाग्य असल्यावर मग आणखी काय पाहिजे? हं, चालूं द्या सपाटा-येथें तिसरें कोणी नाहीं.

**त्राटिका**-(आपल्याशी) बाई बाई, शर्थ झाली या मोंडपणाची! परत जाईन तर मघाशींच मी आलें तेव्हां बाबांनीं दार लावून टाकलें आहे. आणि पुरुषाला भिऊन मागें गेलें तर मग मला घरचीं माणसें वर तरी तोंड करूं देतील का? कसेंही करून याला हटविलेंच पाहिजे. पण याला आतां ह्मणावें तरी काय!

( उघड ) तुह्मीं आपलें तोंड आटपतां कीं नाहीं ? थांबा, मी बाबांना जाऊन सांगतें.

प्रताप०–( आपल्याशीं ) तूंचें तुह्मी झालें ! ठीक आहे. ( उघड ) येथपर्यंत मजल आली का ? शाबास ! पण मामासाहेबांना — कारण ते आतां माझे मामासाहेब झालेच ह्मणावयाचें — सांगण्याचें काम माझें. तूं कांहीं करूं नको. अक्षर देखील बोलूं नको. मी सारी व्यवस्था करतों. माझी पट्टराणी होण्याचें तूं कबूल केलेंस त्याबरोबरच मला तुझा दास करून टाकलास. आतां हा दास तुझ्या सेवेला तत्पर आहे. किती खोडसाळ लोक असतात तरी ! ही द्वाड, कैदाशीण, उद्धट, हट्टी, कजाग आहे असें त्यांनीं मला सांगितलें, पण येथें तर सारा उलटा प्रकार आढळतो. नम्रता, विनय, आणि लज्जा यांची ही मूर्तिमंत पुतळी आहे. किती खुबीनें हिनें आपल्या मनांतला भाव सुचविला. बरें तर, आनंदी, तिथी कोणती ठरवावयाची ?

त्राटिका–कसलीरे तिथी मेल्या ! तुझी पुण्यतीथ केव्हां येईल म्हणून मी वाट पहात आहें !

प्रताप०–माझी एकट्याचीच का ? अग तुझी आणि माझी अशी म्हण. तुझें माझें लग्न व्हावयाचें ती पुण्यतीथच, यांत काय संशय ? असा दुसरा जोडा त्रिभुवनांत तरी मिळेल का ?

त्राटिका०–आटपतोस का नाहीं आपलें तोंड ? कां करूं बंद ! ( मूठ वर उगारते. )

प्रताप०–प्रिये, इतकी उतावीळ होऊं नकोस. तुझ्या त्या पोवळ्यासारख्या ओंठांनीं माझ्या तोंडाला कुलूप बसावें असा योग आणतों लवकरच जमवून.

त्राटिका-मेल्या निर्लज्जा, कर काळें येथून ! नाहीं तर आतां खेटरेंच मिळतील !

प्रताप० खेटरेंच ! तुझ्या बापानें तुला खेटरेंच का दिलीं आहेत ! उघडच आहे तर मग तुझ्या रागाचें कारण. माझी तूं एकदां झालीस कीं मी बघ तुला कसे रेशमासारखे मऊ मऊ जोडे देतों.

**त्राटिका**-देवा, आतां करूं तरी काय ? हा माझ्या पाठीचा ब्रह्मराक्षस कसा सुटेल तो सुटो. माझ्या अंगाची कशी लाही हो-ऊन गेली आहे !

**प्रताप०**- हा सारा प्रताप त्या कामाचा बरें ! तोच ब्रह्मराक्षस. पण हा आहेना जबरदस्त पंचाक्षरी ! हा प्रताप तुझा झाला कीं त्या कामाचें कामच झालें. थोडा धीर धर !

**त्राटिका**-धीर नाहीं पण कान धरतें ! (त्याचा कान धरावयास पुढें जाते. )

**प्रताप०**- अग इतकी कशाला तसदी घेतेस ? हा पहा कान पुढें केला. काय तुला सांगावयाचें असेल तें सांग. पण मोठ्यानें बोललीस तरी येथें कोण ऐकावयाला आहे ?

**त्राटिका**-मेल्या तुझ्या कानांत काय सांगावयाचें आहे ! येथून जाऊं द्या आपली एकदांची धिंडका. आपलें बिऱ्हाडबाजलें—

**प्रताप०**-अग बिऱ्हाडाची वगैरे चोख व्यवस्था आहे. आणि बाजलें कां ? तुला निजावयाला उत्तम सोन्यारुप्यानें मढविलेले पलंग देतों. माझ्या येथें कांहीं कमी नाहीं. आणि त्यांतून बाज-ल्याची वेळ आली कीं बाजलें मिळेल. एकूण बायकांना मूल व्हावें अशी फार इच्छा असते असें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. ( **त्राटिका** तोंड फिरविते. ) प्रिये, लाजतेस कां ? ही इच्छा कांहीं बावगी नाहीं.

**त्राटिका**-कोणरे लाजते, मेल्या ! (असें ह्मणून हात उगारून त्याला मारावयाला धांवते. तो तिचा हात आपल्या हातांत घेऊन धरून ठेवतो. )

**प्रताप०**-( आपल्याशीं ) आतां हा प्रसंग आटपावा हें बरें. ते पहा धनाजीराव इकडेच येताहेत वाटतें. ( उघड, मोठ्यानें ) आ-नंदी, तुला शेवटचें सांगतोः मी तुझ्याशीं लग्न लावणारच. हा प्रताप प्रेमळ पतीप्रमाणें तुझ्याशीं वागावा अशी जर तुझी इच्छा असेल तर तुला त्या धोरणानें वागलें पाहिजे. दुसऱ्याचा तोरा चालूं द्यावयाची मला संवय नाहीं. या मामासाहेब, हा पहा तुम-

त्यादेखतच हिनें आपला हात माझ्या हातांत दिला. आणखी काय पाहिजे ?

**धनाजीराव येतो.**

( **त्राटिका** हातें हिसकूं पाहते. ) अग, लाजूं नकोस. हा घे हात सोडला.

**धनाजी**०–कां प्रतापराव, कसें काय ?

**प्रताप**०–अहो, कसें काय, काय विचारतां ? फत्ते झाली. हा प्रतापराव कधीं मोडा घेऊन यावयाचाच नाहीं. तुमच्या समक्ष नाहीं तिनें माझ्या हातांत हात दिला ?

**धनाजी**०–मुली, कसें काय ? ठरलें ना हें मग.

**त्राटिका**-मला कांहीं विचारूं नका. मला मुली ह्मणून हांक मारावयाला लाज नाहीं वाटत ? तुह्मांला मी नकोशी झालें असलें तर माझें कोणा तरी जिवंत धटिंगण समंधाशीं लग्न लावून देण्यापेक्षां विहिरींत का नाहीं ढकलून देत ? मला कांहीं विचारूं नका. ( रडूं लागते )

**धनाजी**०–प्रतापराव, हें काय ?

**प्रताप**०–अहो, असें काय करतां तुम्ही ? ' मला कांहीं विचारूं नका ' यावरून नाहीं का तुमच्या लक्ष्यांत आलें. असल्या कामीं ती काय बोलणार ? आणि तिला बोलावयाची जरूरच नाहीं. मी आतां तिच्याबद्दल जाब देणारा खंबीर आहेना. शिवाय असें पहा, तुमच्याकडून मुली ह्मणून घेण्याचा तिला आतां कंटाळा आला आहे. वास्तविक पाहतां तिचें वय आतां इतरांना मुली ह्मणावयाचें. तुह्मीं तिचें यापूर्वींच लग्न करावयाला पाहिजे होतें. कां नाहीं तिला तुमचा राग येणार ? अहो, तिचें हें सारें उपरोधिक भाषण आहे. प्रिये, तुझें उत्तर अगदीं रास्त आहे; पण तूं आपलें रडें आवर. मीं तुला मघांशींच सांगितलेंना, कीं तुझे दुःखाचे दिवस सरले असें समज. मला मोठें आश्चर्य वाटतें कीं तिचा खरा स्वभाव आपल्याला देखील कसा कळला नाहीं? तिच्यासारखी हुशार, प्रेमळ, मनमिळाऊ, शांत, धोरणी, नम्र, सभ्य बायको हजारांत मिळावयाची नाहीं. आमच्या दोघांचा

एकविचार होऊन ठरलें आहे, कीं येत्या दशमीचाच मुहूर्त धरावयाचा !

**त्राटिका**-( त्रासानें एकीकडे ) मेल्या; तुला सुळीं द्यावयाचा मुहूर्त !

**धनाजी**०-प्रतापराव, तिच्या मुद्रेवरून तिची कांहीं खुषी दिसत नाहीं.

**प्रताप**०-झालें तुमचें बोलणें ? तुम्हांला असें कसें कळत नाहीं? तिनें तोंड फिरविलें खरें, पण त्यावेळीं डोळ्याच्या एका कोपऱ्यांतून माझ्याकडे पाहिलें आणि मला खूण केली ती कोठें-तुह्मीं पाहिली ? आणि असें पहा, तिच्याशीं लग्न लावणारा मी; तिनें कशी मुद्रा केली, ती कांहीं बोलली, तरी तें मला पसंत आहे. तिचें आमचें असेंच ठरलें आहे, कीं लोकांत तिनें असेंच वागावयाचें. नाहीं तर काय, तुमच्या मतें तिनें एकदम येऊन आमच्या गळ्याला मिठी मारून चुंबन घ्यावें ? तशांतली ती नाहीं. ती फार सभ्य व मर्यादशील बायको आहे ! बाकी प्रेम दाखविण्याचे प्रकार जितके तिला माहीत आहेत तितके दुसऱ्या स्त्रियेला क्वचित्च माहीत असतील. मघांशीं तुह्मी नव्हतां. तिनें काय मौज करून दिली ह्मणतां ! शब्दांनीं, हावभावांनीं, नेत्रविक्षेपांनीं माझें मन वेधून टाकून मला अगदीं आनंदसागरांत बुडवून टाकिलें. तोंडानें तर नाहीं ह्मणावयाचें, पण हावभावांनीं त्याच्या उलट भाव सुचवावयाचा. प्रिये, रागाऊं नकोस. नाहीं सांगत मी ती सारी गम्मत यांना ! तुला किंवा मलाच ठाऊक ती. ( त्राटिका रागानें तोंड फिरवते. ) ओहोहो, काय मुरका मारला पण ! मामासाहेब, ठरली तिथी. आतां गांवीं जाऊन तयारीला लागतों. आनंदी, कपडालत्ता व दागदागिने असे कांहीं आणतों कीं त्यांत सजलेली तुला पाहून इतर स्त्रियांनीं माना खालीं घालाव्या व तुझा हेवा करावा. ( ती जाते असें पाहून ) बरें, जा तूं आतां.

**धनाजी**०-मुली, मग देऊंना यांना वचन ?

[ **त्राटिका** कांहीं न बोलतां पाय आपटीत जाते.

**प्रताप**०-ती कशी बोलणारहो ! येतों तर मामासाहेब ! मुहूर्त

**धनाजीराव, रणधीरराव, ....**

**रणधीर०**-हें लग्न तर बोवा अगदीं उभ्याउभ्या जमलें ! अगदीं नव्हेवाईक प्रकार हा !

**धनाजी०**-काय सांगूं तुम्हांला ? हें लग्नाचें ठरविलें खरें; पण जसा एखादा धोक्याचा सट्टा करावा तसें माझें मन कचरतें आहे.

**येसाजी**-जाऊं या हो. सट्टा धोक्याचा मुळींच नाहीं,-तुमच्या तरी निदान दृष्टीनें. तुमच्यामागें ही एक पीडाच होती कीं नाहीं ? गिऱ्हाइकाचें कसें होईल याची काळजी तुम्हांला कशाला ? तो कांहीं अंधळा नव्हता.

**धनाजी०**-हो; तें खरें, पण मुलीला यांच्यापासून सुख मिळेल का नाहीं याची काळजी वाटते. तिला जर दुःख झालें तर देवाच्या घरीं मी अपराधी होईन.

**रणधीर०**-आतां नका अशा पोकळ शंका काढीत बसूं. आजकाल मला एक तरी बाप असा दाखवा, कीं जो मुलीचें पुढें कसें होईल याची काळजी करतो. कसें तरी करून मुलीचें लचांड घरांतून बाहेर काढावें हाच ज्याचा त्याचा विचार.

**येसाजी**-(हंसून) रणधीरराव ह्मणतात तें अगदीं खरें आहे. अहो, आपण नेहमीं पहात नाहीं का, कीं अगदीं गलितावयव किंबहुना प्रत्यक्ष प्रेताशीं आपल्या लहान मुलीचें लग्न लावून उघड्या डोळ्यांनीं तिला वैधव्याग्नींत लोटणारे बाप कांहीं थोडे थोडके नाहींत.

[illegible] मन

[illegible] आहे हें शब्दांनीं बोलून [illegible] जागं नाहीं.

**रणधीर०**-अहो छोटेराव ऊर्फ पोरकटराव, आपली प्रीति माझ्या प्रीतीच्या पासंगाला तरी पुरेल ?

**येसाजी**-अहो, तुह्मांला जें कांहीं सांगावयाचें असेल तें धनाजीरावांना सांगा. माझ्याशीं कां उगीच भांडण काढतां ?

**रणधीर०**-मोठा आला आहे तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगावयाला. अजून मिशी देखील पुरतीशी दिसूं लागली नाहीं, तोंच मला शहाणपणा शिकवूं पाहतोस ?

**येसाजी**-अहो थेरडेराव, सुरकुत्यावाले, टकले शिलेदार, तुह्मीं कितीही बेमालूम कलप केला तरी आपलें ह्मातारपण झांकत नाहीं, समजलां ? 'साठी आणि बुद्धि नाटी' अशी एक म्हण आहे ती आपल्याला माहीत असेलच. हें पहा, आपल्या प्रीतीचा कोंब आंतल्या आंत मोडून टाका. त्याची ऊब इतकी कडक कीं एखाद्याला हिंव भरावयाचें.

**रणधीर०**-तुझी प्रीति मोठी ऊबदार. जपहो, नाहीं तर आपल्या या मदनज्योतीनें आपलें प्रीतिपात्र होरपळेल एखादें. चल, हट पोरा मागें. तुला संसाराची कांहीं तरी माहिती आहे ! आमच्यासारख्या वयस्क आणि पोक्त माणसांनाच संसारसुखाचें बीज ठाऊक असतें.

**येसाजी**-असें काय ? पण अगोदर यांच्या मुलीला उष्टें खाणें पतकरतें का याची नीट चवकशी करा. आणखी एक आपल्याला

चारीक गोष्ट सांगतों. बोलतांना तोंड आंवळून धरीत जा ह्मणजे आपल्या त्या दंतपंक्तींतील खिंडी दिसणार नाहींत.

**धनाजी०**-तुह्मी दोघेही भांडूं नका. याचा निर्णय करण्याचें काम माझें आहे. धाकट्या मुलीवर माझें प्रेम विशेष आहे हें तुह्मी जाणतांच. तेव्हां जेथें तिचे हाल होणार नाहींत, चांगलें ऐश्वर्य उपभोगावयाला सांपडेल तेथेंच मी तिला देणार. रणधीर-राव, बोला तुमची घरची स्थिति कशी काय आहे?

**रणधीर०**-आमचा वाडा तुह्मीं पाहिलाच आहे. त्याचे चारी चौक तऱ्हेतऱ्हेच्या मौल्यवान् चिजांनीं भरले आहेत. बिलोरी सामान, हंड्या, झुंबरें, आरसे, वगैरे मनमुराद भरलें आहे. सोन्यारुप्याच्या ताटेवाट्यांचे जोड शेंदोनशें आहेत. तसेंच नकशीचीं पानसुपारीचीं तबकें, चुनाळ, चौफुलें, अत्तरदाण्या, गुलाबदाण्या वगैरेंची गर्दी आहे. भरजरी किनखापी कापडचोपडही पुष्कळ आहे.

**येसाजी**-(हंसून) हिराच्या केरसुण्या, खराटे, केराच्या टोपल्या, जाळावयाचें सरपण—हुं, चालूं द्या अडतीची यादी.

**रणधीर०**-बरें बरें, गप्प बस पोरा. फार चावटपणा करशील तर दांत पाडून टाकीन.

**येसाजी**-'आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळ वेळ तयालागीं.'

**रणधीर०**-(तिरस्कारानें) उं! तुमचं देव भले करो, काय ह्मणत होतों बरें? हां, कापडचोपड पुष्कळ आहे पैठण्या, शालू, शेले, शालजोड्या, दुपटे, यांच्या पेट्या भरलेल्या आहेत. डागदागिने हिऱ्याचे, मोत्यांचे, सोन्याचे सबंध जोडच्या जोड तयार आहेत. तसेंच हें सर्व सामान ठेवावयाला निरनिराळ्या आकाराच्या व घाटाच्या चंदनी पेट्या व सोन्यारुप्याच्या व नकसकामाच्या संदुकाही आहेत. शिवाय जमीनजुमला, शेतं, मळे, बागा, हैसुरी व काठेवाडी बैलांच्या जोड्या, अरबी घोडे वगैरेही आहेतच. आतां मी ज़रा वयस्क झालों आहें खरा पण त्याचें कांय! आपण

रुकार दिला तर या सर्व मालमत्तेची आपली मुलगी एकटी मालकीण होईल.

**येसाजी**-अगदीं रास्त बोललां आपण! आपला कांहीं आतां नेम नाहीं. दहा गेले आणि पांच राहिले. केवळ मालमत्तेच्या उपभोगानेंच सुख होत असतें तर ह्या मालमत्तेची ती लवकरच एकटी मालकीण होईल खरी, पण तिला सारा जन्म वैधव्यदुःखांत कंठावा लागेल याचें काय? वाः काय खासें स्थळ! धनाजीराव, यांनीं आतां वर्णन केलें त्या प्रकारचे मौल्यवान व उत्तम उत्तम चिजांनीं भरलेले तीन वाडे, शिवाय वर्षास शाश्वत उत्पन्न पांच हजार रुपयांचें, असें जर मीं दाखविलें तर? कां आजोबा, आतां आपल्याला कसें काय वाटतें?

**रणधीर०**-अरे पोरा, वाटावयाचें काय त्यांत? माझा देखील व्यापार वर्षास चारपांच हजारांचा चालतो. आज माझी शंभर गाडी बंदराकडे माल घेऊन गेली आहे. चेहरा उतरलासा?

**येसाजी**-कोणाचा? आपलाच असेल. आपण आतां चाळीशी लावाच. वय लपविण्याकरितां नका असे हाल करून घेऊं. हें पहा, आपली ती व्यापाराची फुशारकी राहूं द्या. व्यापारांतला पैसा हातीं येतोच असें कांहीं नाहीं. त्यांतून व्यापारी ह्मणजे हलकेच. पिढीजाद जहागीरदारांची बरोबरी का त्यांच्यानें करवणार आहे? माझ्या वडिलांना आहे येळापूरजी जहागीर बादशाहापासून मिळालेली. कां थेरडोपंत, आतां बसली का दांतखिळी?

**रणधीर०**-आत, आपल्याजवळ मीं सांगितलें याच्याहून अधिक ह्मणजे खुद्द आमची स्वारी. ती मी आपल्या मुलीला द्यावयाला तयार आहें.

**येसाजी**-अहारे स्वारी! दिवा ओवाळा. आपल्याला धरून का जाळावयाचें आहे? वास्तविकपणें पाहतां तेवढाच कायतो आपला सोहळा होणें राहिलें आहे. बरें तर मग, धनाजीराव, ठरलेंच आपली मुलगी मला द्यावयाचें?

**धनाजी**०-हो, तसें खरें. पण आपल्या वडिलांकडून रुकार मिळाला पाहिजे.

**येसाजी**-हे आतां उगीच कांहीं तरी तर्क काढतां झालें. आपल्या मुलीशीं लग्न लावलेलें माझ्या वडिलांना नापसंत होण्याचा मुळींच संभव नाहीं.

**रणधीर**०-अरे, तुझ्यासारख्या फटकळ व बेमुरवतखोर लेकावर बापाचा भरंवसा कितपत असेल याची शंकाच आहे.

**धनाजी**०-तें कांहीं नाहीं. दशमीला आनंदीचें लग्न होईल. तेथून पांच दिवसांच्या आंत तुम्ही ह्मणतां याची तुमच्या वडिलांकडून खातरजमा झाली पाहिजे. न झाल्यास सहावे दिवशीं कमळा मी रणधीररावांना देणार. समजलां ? मी जातों आतां आंत.

**रणधीर**०-रामराम तर. ( **धनाजीराव** जातो.) अहो गर्भश्रीमंत बिनमिशे ! रामराम. कमळा ह्मटलें आतां आमची. आपल्या ह्मणण्याला वडिलांचा रुकार खास मिळत नाहीं, आणि तुह्मी जहागीरदार ह्मणजे कर्जबाजारी असावयाचेच. येतांना कर्जाचें टिपण घेऊन यावयाला आपल्या वडिलांना ल्याहा. रामराम. [ जातो.

**येसाजी**-जा थेरड्या हंसत. कमळा जेव्हां हातची जाईल तेव्हां डोळे उघडतील तुझे. तुझे शिल्लक राहिलेले दांत जर पाडीना तर माझें नांव येसाजी नव्हे. शेवटीं त्या जहागिरीनें या ह्मातान्याच्या तोंडाला गुडदी बसली. या कामीं किती पण थापा माराव्या लागल्या ! आणि लागणार ! उंः त्यांत काय आहे ! लग्नाच्या कामीं थापा माराव्या, त्यांत कांहीं पाप नाहीं असें मुळीं शास्त्रच आहे. आतां एक लटका बाप पैदा केला पाहिजे. जगांत नेहमीं बापाकडून लेक पैदा होतात. लेकानें बाप पैदा केल्याचें हें पहिलेंच उदाहरण होणार. [ जातो.

# अंक तिसरा

## प्रवेश १.–कुसुमपूर. धनाजीरावाच्या घरांतील मागील माडी.

रंभाजीराव आसनावर बसला आहे. पुढें पोथी आहे.

**रंभाजी०**–असो; येथपर्यंत तर सारें ठीक जुळलें! आरंभींच तो मर्कटय्या घरांत घुसूं पहात होता, तेव्हां जरा भीति वाटली; पण त्या मर्कटय्याचें बस्तान आमच्या त्राटिकाबाईनीं खासें बिनसविलें. पण तो कोडगाच! कालच्या पत्राच्या प्रकारावरून ही स्वारी पक्की निगरगट्ट दिसते. तेव्हां आतां त्याचे दांत चांगलेच पाडीले पाहिजेत, आणि आपल्या हेतूचाही पाठलाग विशेष जोरानें केला पाहिजे. कमळेचें मन आपलेंसें करून घेणें सोपें आहे. मात्र एक शंका आहे. बापाला न विचारतां, किंबहुना त्याच्या मर्जीविरुद्ध ती माझ्याबरोबर गुप्त रीतीनें विवाह लावून घ्यावयाला तयार होईल किंवा नाहीं याबद्दल प्रश्न आहे. पाहूं प्रयत्न करून. प्रयत्नाअंतीं परमेश्वर! मावशी भोळी, भाविक व हिच्यावर अत्यंत प्रेम करणारी आहे, हें एक बरें आहे. वडील धनाजीराव केवळ द्रव्याकडे पाहणारे आहेत हेंही एक सुचिन्हच आहे. मावशीच्या मनांत इतकें तर भरवून दिलेंच आहे, कीं मुलीला योग्य वर कोणता हें तिला जसें कळणार तसें केवळ व्यवहारदृष्टि बापाला कळावयाचें नाहीं. त्या थेरड्या रणधीररावाचा तर तिला अत्यंत तिटकारा आहे. धनाजीरावानें त्याला एकदम नकार दिला नाहीं ह्मणून ती आधींच संतापली आहे. त्या आगींत तेल ओतण्याचें काम आपलें. आणि मग–अरे, पण कमळा आलीच वाटतें. चला तर पोथी उघडूं या. (पोथी उघडून एक पान हातांत घेतो.)

कमळा येते.

आज तूं एकटीच! मावशी कोठें आहेत!

**कमळा**-( खालीं बसून ) मावशी गेली आहे त्या लक्ष्मीबाईकडे.

**रंभाजी०**-होय का ! मग आज अनाध्याय तर मग ? बरेंच झालें. ( पोथी गुंडाळूं लागतो. )

**कमळा**-हें पहा किनई मला एकटी बसून कंटाळा आला आहे. ती मेली चंपाही कोठें कामाला ह्मणून केव्हां गेली ती आलीच नाहीं, ह्मणून ह्मणतें आपल्याला सवड असेल, तर आपण त्या दिवशीं ह्मणाला होतां कीं एका राजकन्येची गोष्ट तुला सांगेन, ती आज सांगावी.

**रंभाजी०**-ठीक आहे. मला सवड आहे तर काय झालें ? ( आपल्याशीं ) प्रसंग ठीक आहे. रंभाजी, आतांच आहे तुझ्या अकलेची परीक्षा. ( पोथीचीं पानें चाळून त्यांतून एक पान घेतो. ) ऐक तर नीट लक्ष लावून. पूर्वीं एकदां कुबेरनांवाचा धनाढ्य सरदार होता. त्याला एक कमलनयना नांवाची उपवर कन्या होती.

**कमळा**-( आपल्याशीं ) अगबाई या गोष्टींतलीं नांवें बाबांच्या आणि माझ्या नांवाशीं जुळतात !

**रंभाजी०**-तिचें लावण्य तर केवळ अप्रतिम होतें. तिचें तें गौरवर्ण शरीर, ती चंचल व तेजस्वी असून सौम्य नजर, तें सरळ, पातळ व मध्यम लांबीचें नाक, तें अर्ध उमललेल्या गुलाबाच्या कळीप्रमाणें मोहक ओष्ठसंपुट, ती चिंचोळी हनुवटी, दोन्ही गालांवर मधोमध असणारी ती खळगी; शरीराचा सुबक बांधा, व याला अनुरूप असे वर्धिष्णु अवयव, इत्यादि सौंदर्याची सिद्धता पाहून ज्याचें मन वेधलें नाहीं असा पुरुष क्वचितच. तिच्या प्राप्तीसाठीं हजारों तरुण पुरुष रात्रंदिवस तळमळत होते. काय सांगूं तुला ? तारुण्य आणि रूप हीं ज्या कन्येच्या अंगीं आहेत ती आमच्यासारख्या तरुण भ्रमरांचा घात करणारीच. तुला कसें वाटतें ?

**कमळा**-हें काय बाई विचारावयाचें ? मला नाहीं कांहीं समजत.

**रंभाजी०**-यांतलें तुला कांहीं समजत नाहीं हेंच ठीक आहे. बरें असो. त्या कमळेसाठीं नाहीं त्या कमलनयनेसाठीं शेंकडों तरुण व कमीअधिक मानानें गुणवान् व ऐश्वर्यवान् अशा वरांकडून मागण्या आल्या. पण तिचा बाप कुबेर याची गुणापेक्षा

ऐश्वर्यावर दृष्टि विशेष असल्यामुळें, त्यानें तिच्या मनाच्या साहजिक कलाचा विचार न करतां तिला एका वयस्क पण श्रीमंत अशा बगला देण्याचें योजिलें.

**कमळा**–खरेंच बाई, असा का मेला तो बाप होता? नुसत्या पैशाला काय घेऊन जाळावयाचें आहे!

**रंभाजी०**–त्या मुलीनें त्या पुरुषाला पाहिलें होतें. ऐश्वर्याखेरीज दुसरा कोणताच गुण त्याच्या अंगीं नाहीं हें तिला माहित होतें. शिवाय तिचें मन दुसऱ्या एका गुणवान, सुंदर पण स्थितीनें गरीब अशा तरुणावर गेलें होतें; पण बिचारी करते काय? अशा अडचणीच्या वेळीं आईचा उपयोग व्हावयाचा. कारण वरांत कोणते गुण अवश्य पाहिजेत हें जाणण्यास बापापेक्षां आईच विशेषतः योग्य. मुलीचा ळळा आईला जितका असतो, तितका बापाला नसतो असा नेहमींचा अनुभव आहे.

**कमळा**–खरेंच तें. मला आईचें सुख फारसें ठाऊक नाहीं; पण बाबांपेक्षां मावशीचें प्रेम माझ्यावर अधिक आहे. त्यावरून आईचें किती असेल याची कल्पना करतां येते. आपलें सुखदुःख तिच्यापाशीं मोकळ्या मनानें सांगावें असें वाटतें. बाबांच्याबद्दल तसें वाटत नाहीं.

**रंभाजी०**–रास्तच आहे. तुझ्याप्रमाणेंच या मुलीच्या दुर्दैवानें तिची आई लहानपणींच वारली होती. यामुळें आपलें हृद्गतदुःख सांगावयाला तिला कोणीच नव्हतें. तिच्या पित्याच्या मनाला असें वाटलें, कीं आपण पसंत केलेला वर कन्येला मान्य असलाच पाहिजे. सुमुहूर्तावर ठरविलेल्या वराशीं त्यानें आपल्या कन्येचें लग्न लावून टाकलें व आपण एका मोठ्या ऋणांतून मुक्त झालों असें मानून तो सुखी होऊन राहिला.

**कमळा**–अरेरे! देवा, हे बाप किती निष्ठुर असतात! मुलीला काय वाटलें असेल याची शंका देखील त्याच्या मनांत आली नाहींना?

**रंभाजी०**–अग तुला जगाचा जास्त अनुभव आला ह्मणजे असें आढळून येईल, कीं बापाचें प्रेम कितीही झालें तरी मर्यादितच

असावयीचें. खरें निष्कपट प्रेम काय तें आईचें. पण अगोदर सारी कथा ऐक तर खरी. त्या हतभाग्य मुलीच्या नवऱ्याच्या अंगीं एक देखील गुण नसून अनेक दुर्व्यसनें नखशिखांत खिळलीं होतीं. तथापि ती स्वतः सद्गुणी, सच्छील व सदाचारी असल्यामुळें तिनें ही भयंकर निराशा सोसून आपलें पातिव्रत्य ढळूं दिलें नाहीं. नवरा तर तिच्याकडे कधींही खऱ्या प्रेमानें पहात नसे. त्याची दृष्टि नेहमीं विषयेच्छेनें धुंद असावयाची. त्या दोघांचा एकजीव कसा व्हावा ? आणि एकजीव जेथें नाहीं त्या पतिपत्नीच्या सहवासांत सुख कोठचें ?

**कमळा**-मला बाई एक शंका आली आहे. अगदीं लहानपणापासून जर नवराबायकोचा संबंध असला तर त्यांच्यांत कदाचित् प्रेम नाहीं तरी निदान आदरबुद्धि उत्पन्न होईल. पण माझ्या वयाच्या ह्मणजे जिला आपलें हिताहित कळूं लागलें आहे-तिची गांठ एकदम एखाद्या अनोळखी तरुणाशीं घालून देणें धोक्याचें नाहीं का ?

**रंभाजी०**-अग, तेथेंच तर सारी गोम आहे. पण आमच्या हल्लींच्या स्थितींत कशाचाच कोणी विचार करूं नये असें ठरलें आहे. तें असो. त्या कमलनयनेला तिघी सवती होत्या, पण त्यांत एकही तिच्यासारखी सुशील नव्हती. त्यांनीं हिचा नानाप्रकारें छल केला. सवतींच्या वैरासारखें दुसरें कोणतेंच वैर नाहीं. असो. कथा संबंध सांगत बसलों तर फार लांबेल, ह्मणून थोडक्यांत सांगतों कीं नाजूक प्रकृति, मृदु अंतःकरण, उन्नत मनोभाव, दारुण निराशा, प्रेमाश्रयाचा अभाव, सासूयसपत्निवर्गाकडून छल व पतीकडून असह्य अवहेलना,-हीं सर्व एकच झाल्यावर ही कोमल लतिका लवकरच कोमेजून करपून गेली यांत काय नवल !

**कमळा**-शिव शिव ! काय ही बिचारीची दशा ! पुराणीकबोवा ही कथा तुह्मीं मला सांगितली नसती तर फार बरें झालें असतें ही ऐकल्यापासून माझें मन अगदीं खळबळून गेलें आहे. देवाच्या घरचा हाच का न्याय !

**रंभाजी०**-अग वेडे, देवाला व्यर्थ कां दोष देतेस ? देवाची करणी अगाध आहे. त्याचे अंतस्थ हेतु आह्मां मानवांना काय कळणार ? वास्तविक पाहतां अशा प्रकारच्या उदाहरणांपासून देवावरचा आपला विश्वास दृढ होईल, असाच बोध घेतला पाहिजे. बरें तें असो; तूं अगोदर हें सांग कीं त्या बापाचें करणें तुला पसंत आहे का ?

**कमळा**-बाप कसला तो ! मेला तिचा मागच्या जन्मींचा वैरी असावा.

**रंभाजी०**-मी तसेंच केवळ ह्मणत नाहीं. पण हें खरें कीं आपल्या मुलीच्या लग्नाच्या कामीं त्यानें अविचार दाखविला व तिच्या जन्माचें मातेरें केलें. त्याच्या मनांत मुलीचें अकल्याण व्हावें असें बिलकुल नव्हतें. पण द्रव्य असलें ह्मणजे सर्व कांहीं मिळतें. द्रव्य हेंच सुखाचें आदिकारण, अशी त्याची मूर्खपणाची समजूत होती. हल्लींच्या काळींही अशा समजुतीचे बाप थोडे-थोडके नाहींत.

**कमळा**-असतील तर काय झाले मेले ! आमच्यासारख्या गरीब मुलींना छळण्यासाठींच जणू कांहीं त्यांचा जन्म असतो.

**रंभाजी०**-कमळे, रागाच्या भरांत तूं भलतीकडे वाहवत चाललीस याचें तुला भान नाहीं. अग वेडे, 'आमच्यासारख्या' ह्मटलेंस त्यास तुला मी असें विचारतों, कीं तुझ्या बापानें तुझा असा कांहीं छळ केला नाहींना ? त्या रणधीररावाशीं त्यानें तुझें लग्न लावलें तर –

**कमळा**-( आपल्याशीं ) आतां माझ्या लक्षांत आलें. यांनीं ही गोष्ट एवढ्याचकरितां सांगितली असावी. आतां आपल्याला उत्तरें जपूनच दिलीं पाहिजेत. ( उघड ) राहूं द्या तें. पण मला त्या बापाचा अतिशय संताप आला आहे. मुलीचा त्यानें गळा कापला यांत शंका नाहीं. स्त्रियांचा जन्म वाईट बाई. नेहमीं आपलें दुसऱ्याच्या हातीं वागावयाचें. सुख सारें पुरुषांना; आह्मी केवळ दुःखाच्या वांटेकरी.

**रंभाजी०**-छेः छेः ! असें ह्मणूं नकोस. अग, स्त्रियांच्या साहा-

ज्यावांचून या जगांत पुरुषांनीं कोणताच अर्थ साधला नसता. या संसारयात्रेंत सुखाचा, सौजन्याचा, मधुररसाचा, कोमल विकारांचा व वृत्तींचा जो भाग आहे व ज्यावांचून हें जग केवळ रूक्ष अरण्यासारखें झालें असतें,—त्या सर्वांचा उद्भव स्त्रियांपासून. स्त्रियांची स्थिति हल्लीं कष्टप्राय झाली आहे खरी; पण ती सुधारतां येणार नाहीं असें नाहीं. स्त्रियांचें महत्व पुरुषांना पूर्वीं कळत होतें तसें पुढेंही कळणार नाहीं कशावरून ?

**कमळा**-आपण ह्मणतां तसें कधीं होईल तें होवो. तूर्त तरी बायकांचें जिणें सर्वस्वी पराधीन व दुःखाचें आहे खरें. आपणच सांगाना, त्या कमलनयनेला आपल्यापुढें असलेला दुःखाचा डोंगर दिसत होता पण तिला तो टाळतां आला का ?

**रंभाजी०**-तुझा हा प्रश्न फार नाजूक आहे. त्याचें उत्तर जपून दिलें पाहिजे. माझ्या मतें त्या अडचणींतून सुटण्याचा तिला एक मार्ग होता. पण तितकें तिच्या अंगीं धैर्य नव्हतें म्हणा किंवा मार्ग दाखविणारें कळकळीचें माणूस कोणी जवळ नव्हतें.

**कमळा**-कोणता बरें मार्ग ?

**रंभाजी०** एक शास्त्रकारांनीं असें ह्मटलें आहेः—'मन्दापदेशा गुणवत्यपि कन्या धनहीना कुलीनापि समानैरयाच्यमाना मातापितृवियुक्ता वा ज्ञातिकुलवर्तिनी वा प्राप्तयौवना पाणिग्रहणं स्वयमभीप्सेत ॥' ह्मणजे गुणवती असून चांगल्या कुळांतली नसल्यामुळें किंवा कुलीन असून धनहीन असल्यामुळें, आईबाप नसल्यामुळें, उपवर झाली असूनही मुलीला तिच्या योग्यतेच्या तरुणांनीं मागणी केली नाहीं किंवा तिच्या आप्तांनीं लग्न केलें नाहीं तर तिनें स्वयंवर करावें हें वात्स्यायनऋषींचें मत आहे, व इतर ऋषींचेंही यास अनुमोदन आहे.

**कमळा**-तसें असेल; पण त्याचा उपयोग काय ? हजारों मुलींवर आपल्या गोष्टींतल्या मुलीच्यासारखे प्रसंग येतात, पण त्यांतून एकीनें तरी या मार्गानें सुटका करून घेतली आहे का ? किंवा कोणीं करण्याचा प्रयत्न केल्यास लोकांनीं तिला सुखी सोडली

आहे—का ? शिवाय, असें पहा, कीं कथेंतल्या मुलीचा बाप जिवंत होता; आणि मागणी करणारांचाही कांहीं तोटा नव्हता.

**रंभाजी०**–होय. ठीक बोललीस. पण शास्त्रकारांच्या वचनांचा अर्थ केवळ शब्दशःच घ्यावयाचा नाहीं. धोरणानेंच घेतला पाहिजे. आईबाप नसले तर ह्मणजे अर्थात् आईबाप असून तीं आपलें कर्तव्य न्याय्य मार्गानें बजावणार नाहींत तर—असें समजावयाचें. उदाहरणार्थ, कित्येक बाप आपल्या मुलींना द्रव्याच्या आशेनें अगदीं मृत्युमुखीं असणाऱ्या जख्खड थेरड्यांच्या गळ्यांतही बांधण्यास मागेंपुढें पहात नाहींत–असे बाप असून नसल्यासारखे, किंबहुना त्याहूनही वाईट. मग, तूंच पहा–ज्या शास्त्रकारांनीं आईबाप नसतांना मुलीला स्वयंवराचा अधिकार दिला, त्यांनीं आईबाप आपल्या अधिकाराचा क्रूरपणें दुरुपयोग करून मुलीचें जन्माचें नुकसान करूं पहात असले तर अशा प्रसंगीं मुलीला आपलें रक्षण करून घेण्याची मोकळीक दिली नसती काय ? तात्पर्य, आईबापांचा हेतुच नुसता पहावयाचा नाहीं. त्यांच्या कृतीचा परिणाम जर त्यांच्या कन्येच्या सुखाला घातक असेल तर कन्येनें अवश्यमेव आपला पति निवडण्याचा अधिकार आपल्या हातांत घ्यावा.

**कमळा**–आपण ह्मणतां तेव्हां तें खरेंच असेल. मला इतका गूढ विचार करतां येत नाहीं. तरी पण मला अजून एक शंका आहे. बापानें पसंत केलेल्या पुरुषाशीं लग्न न लावतां आपल्या मनांतील पुरुषाशीं लग्न लावण्यांत मुलीच्या हातून चूक होणार नाहीं कशावरून ? मुलीपेक्षां बापाचा अनुभव अधिक, त्याची परीक्षा तिच्यापेक्षां चांगलीच असली पाहिजे. छेः ! मला तर या मार्गांत फारच धोका दिसतो. आणखी घरदार सोडून एका परक्या पुरुषाचा हात धरून जाण्याची एखादीला छाती तरी कशी व्हावी ? शिवाय असें करणारणीला जन तरी काय ह्मणेल ?

**रंभाजी०**–तुला या शंका याव्यात हें तुझ्या पवित्र मनाला शोभण्यासारखें आहे. पण तूं असा विचार कर – बापाला शहाणपण व अनुभव आहे, पण तो त्यांचा योग्य उपयोग करीत नाहीं, तर

त्या शहाणपणाला व अनुभवाला घेऊन काय जाळावयाचें आहे! आणखी असें पहा, बाप कितीही शहाणा असला तरी स्त्रियांना, त्यांतून तरुण मुलींना कोणत्या गोष्टीपासून सुख होईल हें तो काय जाणणार? शिवाय, मुलीनें केवळ आपल्याच मनावर सर्वस्वीं अवलंबून राहूं नये. असल्या कामीं मुलीनें ज्यांचें मत घ्यावें म्हणून शास्त्रकार सांगतात त्यांचीं नांवें सांगतों—

**कमळा**-अगबाई, हें देखील का त्यांनीं सांगितलें आहे! खरेंच, त्यांच्यासारखे शहाणे कोणी नसतील.

**रंभाजी०**-अलबत. शास्त्रकारांनीं जे नियम घालून दिले आहेत ते दूरवर दृष्टि देऊन निरनिराळे प्रसंग लक्षांत आणूनच घातले आहेत. बरें पण कोणाकोणाचें या कामीं साहाय्य घ्यावें तें ऐक:- आपल्या बरोबरीची, पुरुषांच्या गुणावगुणांचें ज्ञान असणारी दाईची मुलगी; किंवा मोकळ्या मनानें बोलतां येण्यासारखी सखी; किंवा मावशी; किंवा विश्वासुक म्हातारी दासी; किंवा पूर्वीच्या आश्रमांत असवा जिचा चांगला स्नेह होता अशी संतीण; किंवा वडील बहीण. अशांचें मत विचारून त्यांच्याच साहाय्यानें सर्व गोष्टी यथासांग केल्या ह्मणजे चूक होण्याची भीति राहत नाहीं व तूं ह्मणतेस त्याप्रमाणें जनाचाही बोल येण्याचा संभव कमी. आणि शिवाय जन त्रिविध आहे. सर्वथा जनाला भिऊनच जर वागावयाचें म्हटलें तर आपल्या हातून कांहींच व्हावयाचें नाहीं,-पण आतां हें पुरें. आज ज्या गोष्टी मीं तुला सांगितल्या आहेत त्या ध्यानीं धर, त्यांचा नीट विचार कर. या जगांत सुख मिळविण्याची संधि रोज रोज येत नाहीं. क्षणिक त्रासाला भिऊन एकदां आलेली संधि घालविली असतां जन्मभर रडत बसावें लागतें. बरें आहे. येतों मी आतां. माझी दररोजची देवदर्शनाला जाण्याची वेळ झाली.

**कमळा**-खरेंच, आजची आपली गोष्ट व त्यावर मागाहून आपण केलेला बोध दोन्हीही माझ्या मनांत अगदीं बिंबून गेलीं आहेत. काय त्या बिचारीची दशा झाली बरें?

[ दोघें जातात.

## प्रवेश २–धनाजीरावाच्या घरांतील दिवाणखाना.

**धनाजीराव, रणधीरराव, येसाजी, त्राटिका व कमळा.**

**धनाजी**०-कायहो, तुमच्या देखतच नाहीं त्यांच्याकडून निरोप आला कीं. आतांचा दहा घटकेचाच मुहूर्त धरून तयारी ठेवा ह्मणून. आतां दहा घटकांना का शिंगें राहिलीं आहेत! घरांत सर्व तयारी, उपाध्येबोवा हातांत अक्षता घेऊन उभे, जोशीबुवांची सारी नजर घटकापात्राकडे,-अजून जांवईबुवांचा ठिकाण नाहीं, याला काय ह्मणावें? ती पहा आनंदी कशी तिकडे रागानें लाल झाली आहे! साऱ्या गांवांत फजिती होण्याची वेळ आली. आरंभीं रुकार देतांनाच मला धास्ती वाटत होती; पण तुह्मीं साऱ्यांनीं त्यावेळीं मला भरीस घातलें. आतां करावें तरी काय?

**त्राटिका**-( पुढें येऊन ) आतां कां रडतां आपण? रडण्याचा हक्क माझा. तेव्हांच मीं माझी नाखुषी दाखविली, पण माझें ऐकतो कोण? आपणच हें सारें दुःख माझ्यावर आणलें आणि आतां वरतीं रडून साजरें करूं पाहतां का! फजितीची वेळ आली ह्मणे! फजिती कोणाची? माझीच फजिती; माझीच छीः थूः! कोठला भामटा आला काय आणि मागणी करतो काय? मागणीची तऱ्हा तरी कोण विचित्र! मी नाहीं ह्मणतें तरी तो मेला म्हणतो "तूं रुकार दिलास, यानें मी फार धन्य झालों," आणि आमचे बाबासाहेब त्याला मान तुकावतात. या मेल्या सोळभोकांना तुम्हांला भरीं घालावयाला काय होतें? त्यांना घालावयाची आहेना त्या आपल्या लाडक्या मुलीवर झडप! कशी तरी माझी धोंड वाटेंतून काढावी हा त्यांचा विचार. पण आपण कांहीं तरी विचार करावयाचा होता कीं नाहीं. कमळेच्या लग्नाच्या वेळीं पहा कशा चवकशा चालतील त्या! आतां जन्मभर वाट पाहिली तरी कांहीं तो येत नाहीं. निर्लज्ज, कोडगे, उनाड, चोर हे! अमक्या पोरीला आह्मीं असें फसविलें अशी फुशारकी मारण्याकरितांच यानें मागणी केली. उद्यां मला रस्त्यांत हिंडण्याची पंचाईत. गांवांतील चहाटळ पोरें माझ्याकडे बोटें दाखवून मोठ्या-

नें औरडतील : " या पहा आल्या त्या वेडेपीर प्रतापरावाच्या पट्टराणी ! अजून नवरदेव कैव्हां येतील याची वाट पहाताहेत!" देवा, यापेक्षां मेलेलें बरें ! ( रडूं लागते. )

**धनाजी०**-मुली, उगीच संताप करून घेऊं नकोस. प्रतापराव असा पाजी दगलबाज मनुष्य दिसत नाहीं. झाला असेल कांहीं कारणानें उशीर.

**त्राटिका**-पुरे, पुरे आतां हें तोंडपुसणें. आपण माझा सर्वस्वी गळा कापलांत!

[ रडत आंत जाते; **कमळा** तिच्या मागें जाते.

**धनाजी०**-जा बाई, तूं आतां कांहीं केलेंस तरी त्याबद्दल तुला बोल लावतां येत नाहीं. हा असा अपमान मोठ्या सहनशील साधूला देखील सोसावयाचा नाहीं.

**तान्या** येतो.

**तान्या**-पायां पडतो जी धनीसाब. रावसाब खबर आणलीया खबर. खबर ताजी हाय ताजी, पन शिळी परगानची हाय.

**धनाजी०**-शिळी आणि ताजी खबर ? हें काय कोडं आहे बुवा ?

**तान्या**-हाय तसंच कोडं ! परतापराव येत्याती ही खबर आपुन ऐकली हाय का ?

**धनाजी०**-प्रतापराव ! कोठें आहेत ते ? आले का ?

**तान्या**-आल असं कोन ल्येक बोलला ? त्ये येत्याती जी येत्याती.

**धनाजी०**-मग येथें केव्हां येतील ?

**तान्या**-आपल्या म्होरं उभ न्हायल म्हंजी.

**येसाजी**-तान्या, चावटपणा बस्स कर. तुझी खबर शिळीप्रमाणें कशी तें सांग पाहूं आतां.

**तान्या**-जी रावसाब ! पन शिळी म्हंजी आपनास्नी म्हाइत हाय असं न्हवं. शिळी म्हंजी अक्षी इद्रुप, वंगाळ, ह्यंगाडी बगा. परतापराव येत्याती पन कस म्हुन न्हाइ इचारलत ? त्येंचा पोषाक लई तऱ्हचा हाय. डोसक्यावर ठेऊन दिलया भलं मोठ्ठ मुंडासं, पन त्याला पदुर बिदुर कायबी न्हाइ. अंगामंदी बंडी हाय तिचा रंगच बगा

उमगायचा न्हाइ. आन् ठिगळं ला-लावून तिला वाकळची सेवा आणलीया. पायांत चोळणा हाय इतकंच पन् तो कसा केलाया त्येंच त्येंनाच न्हाइ तर शिप्याला ठाव. दो पायांत दोन न्यार न्यार फाटक जोड हायत. आन् कंबरला दिलंया येक खलपाटन लटकावून. त्येनं लोनीबी कापायचं न्हाइ. कंबरपट्टा केलाया सुंबाच्या दोरीचा. आन् घोड्यावर सवार होऊनशान् येतीया सवारीन् काय. घोडं बी तसंचं मिळालंया न्हवं का. अक्षी सैलानी वारूच. पंढरीच्या वारकऱ्यावानी टाळकुटं. अंगावर गोमाशांची जनु पंगत बसलीया. तोंडावर, पाठीवर, खुब्यावर मायंदाळ खटं हायतीं. सामानबी त्याच नमुन्याचं हाय. लगाम केलाया पाचपचीस गाठीच्या दोरीचा. पटकुराचं जीन अक्षी चकफक बगा. आन् थाट्टानं सवारी मारं रान कापीत येतीयान् हुं काय?

**धनाजी०**-आणि बरोबर दुसरें कोणी?

**तान्या**-येताळाच्या बराबर दुसरं कोन असतंया? हायना त्ये भूत त्येंचा चाकुर. गड्याचा पोषाक पन् कायै अक्षी धन्यावर तान.

**येसाजी**-हें काय वेड आहे बोवा!

**धनाजी०**-कसे का येईनात! येताहेत हें ऐकून माझ्या जिवांत जीव आला. केव्हांसे येथें येऊन पोंचतील?

**तान्या**-त्ये येतील. छेः बाबासाब, तुमचा ह्येर अक्षी चुकला. त्येंचं घोडं त्येंना घेऊन येईल असं म्हना.

**येसाजी**-ह्मणजे रे?

**तान्या**-तसंच हाय रावसाब. घोड्याच्या मनांत नसलं तर राव हंत् त्येंना पायींच आलं पाहिजे. घोडं जवा शिवपास अक्षी चालना तवा त्येंनीं घ्येतला योक फोक, आन् मारे घोड्याला मार मार मारलं. तवा त्यें चालतं मागंमागंच. तवा त्येनी मारायचं दिलं सोडून आन् आतां जिकड घोडं नेईल तकड चालल्याती. काय पन् तट्टू!

तट्टू माझा रतनघोस, मागं जाई कोस कोस.
खाई शेर शेर दाणा, चालता करी ठणाणा.

**पिल्या**-( आंतून ) अर. वाट सोडा वाट. आमच धनीसाब-

जांवईबुवा–येत्यांती. आन् घोडीं हायतीं लई तापट. लातबीत खाल.

. **तान्या**–या बगा सवाऱ्या आल्याच.

• **प्रतापराव** आणि **पिल्या** येतात.

**प्रताप०**–दंडवत, मामासाहेब; रामराम मंडळी. मामासाहेब, कोठें आहे लग्नाची तयारी ? माझी प्रिया आनंदी कोठें आहे !

**धनाजी०**–पण अगोदर हा पोषाख उतरून स्नान करा. जरा विश्रांति घ्या.

**प्रताप०**–छेः, आतां विश्रांति नाहीं, कांहीं नाहीं. स्नान मी वाटेंनच नदीवर करून आलों आहें. लग्न होऊन आनंदीला केव्हां मी आपली ह्मणेन असें झालें आहे. चला असेच्या असे बोहोल्यावर. नाहीं तर मुहूर्त चुकेल.

**रणधीर०**–तिकडे आतां जालच. पण राव ही पोषाखाची त-ऱ्हा कोठली ? हा पोषाख उतरा.

**प्रताप०**–पोषाखांत काय आहे हो ! पण फुकट वेळ घालवि-ण्यांत अर्थ नाहीं. माझी प्रिया कोठें आहे ? अगोदर तिच्याकडे मला घेऊन चला. मग सावकाश गोष्टी बोलत बसूं. अरे पण तुह्मी असे माझ्याकडे बघतां काय ? तुह्मांला वेड तर नाहीं लागलें ?

**येसाजी**–राव, तुमचा हा नवरदेवाचा पोषाख पाहून आमची अक्कल अगदीं गुंग होऊन गेली आहे; दुसरें कांहीं नाहीं.

**धनाजी०**–आपल्या योग्यतेला, निदान माझ्या योग्यतेला हें शोभत नाहीं. असल्या आनंदाच्या समारंभांत हें अशुभ चिन्ह नको.

**रणधीर०**–राव, आपण लवकर आलां नाहीं त्यामुळें आपल्या भावी कुटुंबाला फार वाईट वाटलें आहे आणि हा असला पोषाख घालून आपण तिच्यापुढें उभे राहिलां ह्मणजे तिला अधिकच खेद होईल. कदाचित् तिला भीतिही वाटेल.

**प्रताप०**–या कामांत आपण कां लुडबुडेपणा करतां ? तिची फिर्याद आपल्याकडे आली तर त्याचा विचार. मी तिची पाहिजे तशी समजूत करीन. आपल्या हजार मोहरा गेल्या, ह्मणून खेद

करून कुत्सितपणानें असलें कुचकें बोलूं नका. पण चला, अगोदर माझ्या त्या मनमोहिनीकडे; आपल्याला नाहीं आतां धीर धरवत.

**येसाजी**-असें काय करतां हो ? अगोदर हीं आपलीं साडेतीन वस्त्रें उतरा. यांच्या येथला पोषाख आपल्याला घालावयाचा नसला तर मी माझ्या घरून नवा आणवितों.

**प्रताप०**-तें व्हावयाचें नाहीं. मी अस्सा या पोषाखांत लग्न लावणार. तुम्हांला पतकरो किंवा न पतकरो. हें पहा, तिचें लग्न माझ्याशीं लागावयाचें का माझ्या पोषाखाशीं ? पोषाख एक बदलतां येईल, पण माझ्या स्वभावांत कांहीं बदल करतां येईल का ? तसें करतां आलें असतें तर तिच्या हितासाठीं व माझ्या हितासाठीं व दोघांच्याही सुखासाठीं मीं मोठ्या खुषीनें तसें केलें असतें. मग उगीच वस्त्रें पालटण्यांत काय अर्थ ? पण मी किती मूर्ख पहा. माझी प्रिया माझ्या भेटीसाठीं उत्कंठित झाली असेल. तिला तशीच काळजींत ठेवून मी येथेंच सुक्या गप्पा ठोकीत उभा राहिलों आहें. मामासाहेब, येनां आंत का मी जाऊं परत ?

**धनाजी०**-चला बोवा आंत.

[ **धनाजीराव**, **प्रतापराव**, **रणधीरराव** आणि **पिल्या** आंत जातात.

**येसाजी**-याच्या या वेडेपणांत कांहीं तरी अर्थ आहे. हा रंगेल गडी असल्या पोषाखानें आला आहे तो केवळ वेडखातर खचित नव्हे. ( **रंभाजीरावास** ) मघां मीं सांगितलेलें आपल्या लक्षांत असेलच. आपण तिचें मन वळविलें तरी वडिलांची संमति पाहिजे. त्याच उद्योगांत मी आहें. एक म्हातारा पाहून त्याला आपले वडील बनवावयाचें व धनाजीरावाच्या होस हो त्याच्याकडून देववायची. आपण तिला पळवून नेऊन घ्या लग्न उरकून. इकडे मी तिच्या बापाची संमति मिळवून ठेवतों.

**रंभाजी०**-कमळेला मीं बरीच तयार करीत आणली आहे. तिच्या स्थितींत बापाच्या मर्जीविरुद्ध वागण्यास शास्त्राची संमति आहे इतकें मीं तिच्या मनांत भरविलें आहे. तरी पण अजून तिची

पळून जाण्याइतकी तयारी नाहीं. आणखी चार जोरदार थापा दिल्या पाहिजेत.

**येसाजी**-हुं, असल्या कामां बेलाशक थापा द्या. तिच्या हिताचीच ती गोष्ट आहे. तिला ह्मणावें ह्मातारा आहे द्रव्याचा लोभी, त्राटिकेप्रमाणें जुलमानें कोणा तरी पैसेवाल्या बोकडाच्या गळ्यांत अडकावून देण्याला तो मागेंपुढें पाहणार नाहीं. त्याच्या मनांतून रणधीररावाला तुला देण्याचें आहे. रणधीररावाला पहिल्या दोन बायका आहेत; तो दमेकरी आहे. अशा मारा थापा. पळावयाची वेळ आली कीं मी देतों तुह्मांला सूचना तान्याकडून. हं, दूर उभे रहा. तो थेरडा उठून आलाच वाटतें.

**रणधीरराव** येतो.

काय राव? मांडवांतून आला वाटतें. असे घाबरलेले का?

**रणधीर०**-दांडग्या पहिलवानापुढें कुस्ती करावयाला उभें राहिलें ह्मणजे जसें होतें तसेंच मला त्या मांडवांत झालें होतें!

**येसाजी**-ह्मणजे नवरदेवांनीं आणखी कांहीं मौज केली वाटतें!

**रणधीर०**-नवरदेव कसचा? अहो नवरराक्षस आहे तो.

**येसाजी**-आणि आमच्या त्राटिकाबाई?

**रणधीर०**-अहो तिला आतां त्राटिका ह्मणूं नका. तिचा त्राटिकेचा अवतार संपला. ती त्याच्यापुढें गोगलगाय झाली आहे. हकीकत तर ऐका. तो उपाध्या जेव्हां याला सांगूं लागला, कीं रावसाहेब मी सांगतों हे शब्द ह्मणा, तेव्हां ही स्वारी चवताळून त्याच्या अंगावर गेली, आणि ओरडून ह्मणते काय कीं "अरे भुदुरड्या, गाढवा, बेअकल्या, हरामखोरा, मला हुकूम करतोस? मला आज्ञा करणारी या जगांत कायती एकटी ही आहे. तुला काय मंत्रबिंत्र ह्मणावयाचे असतील ते मुकाट्यानें म्हण, माझ्या प्रियेला फार वेळ तिष्ठत उभी करूं नको. ती पहा मला भेटावयाला कशी उत्सुक झाली आहे. ईश्वरानें ज्यांची गांठ ब्रह्मसूत्रानें बांधली आहे त्या आह्मांला तूं दूर देऊं पाहतोस? हाडें हाडें मोकळीं करून टाकीन, हं, असा भांवा-

वल्यांसारखा काय बघतोस ? दांतखिळी बसली वाटतें. करूं का बत्तिशी मोकळी ! " हें ऐकतांच त्या भटानें दोनचार मंत्र म्हटले व " सुमुहूर्त सावधान " म्हणून कांपत कांपत बोलला, " रावसाहेब, झालें; आपलें व यांचें लग्न लागलें. " त्या प्रतापरावाचा तो मारा थाट पाहून जमलेल्या मंडळीच्याही अंगावर कांटा उभा राहिला. त्यांनीं भीत भीत दोघांच्या अंगावर अक्षता फेंकल्या.

**येसाजी**-बरें, पण तिनें हें मुकाट्यानें सोसलें ?

**रणधीर**०-गर्भगळित झाली होती. न सोसून काय करते ? ती अगदीं भांबावून जाऊन वाघापुढें शेळी बांधावी तसें तिला झालें होतें. थरथर कांपत होती. तोंडचें पाणी पळालें होतें. डोळ्यांत पाणी कसें भरलें होतें; पण बाहेर आणण्याची भीति. हा काळ काय म्हणेल, काय करील, याची धास्ती. उपाध्या सांगेल तसें करीत होती, पण नजर सारी याच्या डोळ्याकडे. त्यांत जरा नाखुषी दिसली कीं हात तसाच्या तसा, तोंड मट्ट, मान खालीं. त्या वेळीं तिच्याकडे पाहून आपल्याला बोवा तिची दया आली. उपाध्याचे ते शेवटचे शब्द ऐकतांच मी त्या दोघांवर अक्षता टाकून निघून आलों. येतां येतां मागें वळून पाहतों तों या स्वारीनं तिला आपल्याजवळ ओढली आणि दोन्ही हातांनीं घट्ट कवटाळून धरून तिचें तेथल्या तेथें सर्वांसमक्ष त्यानें चुंबन घेतलें आणि म्हणतो काय " अरेरे, काय माझ्या प्रियेला श्रम झाले हे. सर्वांग कसें घामानें थवथबलें आहे. भटुरग्या, तुझा हा त्रास बरें ! मला जर हें अगोदर कळतें तर तुझीं शंभर वर्षें भरलींच होतीं. जाऊं दे लाडके. विसर आतां हा सारा त्रास. तुझे कष्टाचे दिवस सरले. तूं आतां या प्रतापरावाची पट्टराणी झालीस ! " पण आल्याच वाटतें या स्वाऱ्या इकडे.

**प्रतापराव, त्राटिका, कमळा, धनाजीराव** आणि **पिल्या** वगैरे येतात.

**प्रताप**०-मित्रहो, आपण हा समारंभ साजरा करण्याकरितां येथपर्यंत येण्याची तसदी घेतलीत हे आपले माझ्यावर फार उपकार

झाले. आज रात्रीं तुमची आमची आनंदानें एक पंगत व्हावयाची खरी —नानाप्रकारचीं पक्वान्नें आमच्या मामासाहेबांनीं तयार करविलीं आहेत. तो मसाल्याचा घमघमाट, मुदपाकखान्यांतून येत होता तो नाकांत शिरतांच पोटांत काय गडबड उडून राहिली आहे. —पण दोस्तहो, या साऱ्या मजेचा उपभोग घ्यावयाला मी येथें नाहीं ह्मणून मला दिलगिरी वाटते. पण त्याबद्दल तुम्ही रंजीस होऊं नका. माझ्या प्रियेच्या नांवानें आनंदी आनंद करा. मला आतांच्या आतां गेलें पाहिजे. तेव्हां मी आपली रजा घेतों.

**धनाजी॰**—इतकें जरूरीचें काय काम आहे? रात्रीं जेवण करून मग जा.

**प्रताप॰**—छेः मामासाहेब, तुमच्या शब्दाला नाहीं ह्मणावयाचें माझ्या मोठें जिवावर येतें. पण काय करूं ? काम तर तसें निकडीचें. तें सांगावयाला वेळ नाहीं. सांगितलें तर तुह्मीच 'जा' ह्मणून आग्रह कराल. मी मुळीं आलों तेंच मोठ्या जिकिरीनें. (वाटिकेकडे पाहून) हा जर चुंबकमणी मला इकडे न ओढता तर मी आलोंच नसतों. मामासाहेब, माझ्यासाठीं या मंडळींला एक मेजवानी द्या. खर्चाच्या कामीं मागेंपुढें पाहूं नका. मला जें हें रत्न मिळालें आहे त्या आनंदाच्या प्रसंगानिमित्त पाहिजे तितका खर्च झाला तरी त्याची मला किंमत नाहीं. आपण मौज करण्यांत जर कमीपणा ठेवलांत तर मी समजेन, कीं आपला सर्वांचा माझ्यावर लोभ नाहीं. बरें, येऊं तर ? राम राम. पिल्या, जा. घोडीं तयार कर.

[ **पिल्या जातो.**

**येसाजी**—वाः असें काय करतां हो ? जेऊन जा.

**प्रताप॰**—जेवावयाचें नांव काढूं नका.

**रणधीर॰**—र्‍हाहो. इतकें काय अगदीं निकडीचें काम आहे ?

**प्रताप॰**—नाइलाज आहे.

**धनाजी॰**—रात्रपर्यंत नाहीं तर नाहीं. पण आतांच पाहिजे तर ताटें घालावयाला सांगतों. दोन घटका लागतील फार झालें तर.

**प्रताप॰**—मामासाहेब, नका उगीच आग्रह करूं.

**कमळा**—असें काय मेलें हें ! दोन घटकांनीं काय होतें !

**प्रताप०**-आपला शब्द देखील मला मोडावा लागतो ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे.

**कमळा**-बरें आपल्याला काम असलें तर आपण जा. पण ताईला तरी येथें ठेवा. मागून देऊं रवानगी करून.

**प्रताप०**-ठीक आहे. तिची मर्जी असली तर राहील. आणि मग नेहमींच येथें राहीना, माझी कोठें हरकत आहे ?

**कमळा**-यावर काय बाई बोलावें ? ताई, तूं तरी सांगून पहा.

**त्राटिका**-ऐकलं का ? मी हात जोडतें. म्हटलें माझ्याकरितां तरी थोडें रहावयाचें व्हावें.

**प्रताप०**-ठीक आहे.

**त्राटिका**-रहावयाचेंना तर मग ?

**प्रताप०**-तसें नव्हे. तूं हात जोडतेस हें ठीक आहे. हें तुझें नम्रपणाचें वर्तन पाहून मला फार आनंद होतो. बाकी आत्तांच्या आत्तां गेलें हें पाहिजेच. पिल्या, गद्धया, किती सुस्त तूं ! अजून घोड्यावर सामान नाहीं घातलेंस ?

**पिल्या**-( धांवत आंत येऊन ) जी, सामान तैयार हाय कीं. घोडं खाऊन दाण्यावर खोगीर आवळलंया न्हवं ?

**त्राटिका**-अस्सें काय ? आपल्याला वेळ नाहीं काय ? ठीक आहे. आपण खुश्शाल जावें. आपल्याला कोणी अडवीत नाहीं, समजलां ? रस्ता मोकळा आहे. आपण काय पाहिजे तें करा, मी कांहीं यावयाची नाहीं. आजच का, उद्यां नाहीं, परवां नाहीं, तेरवां नाहीं, माझ्या मर्जीला येई तोंपर्यंत येणार नाहीं. पुनः भेट होणार नाहीं ह्मणून मला धमकी दाखवितां होय ? नाहीं झाली तर माझें खेटर गेलें. आपल्याला येथें यावयाला कोणीं बोलावणें का धाडलें होतें ? आपण नसतां आलां तर माझें लग्न व्हावयाचें कांहीं राहिलें नसतें. आणि नसतें झालें तरी कांहीं हरकत नव्हती. कोण मेली अरेरावी ही. नुकतें कोठें लग्न लागलें तोंच इतका दरारा, इतका करडा अंमल ! मी साफ सांगतें मी यावयाची नाहीं. अजून मला तुह्मीं ओळखलें नाहीं.

**रणधीर०**-पाहवें आतां दगड फुटतो का लोखंड वांकतें !

**प्रताप०**-( आपल्याशीं ) ओहो, माझे लाडके, ठीक चालले आहे ! आजचा हा शेवटचाच प्रसंग आहे असें बोलून घ्यावयाचा. हें घर सुटलें, कीं हा प्रकार संपला आणि त्राटिका हें नांवही पण नाहींसें झालें. ( उघड ) तूं हें असें बोलतेस याचें मला बिलकुल आश्चर्य वाटत नाहीं. यांनीं तुला आजपर्यंत तसाच त्रास दिला, पण यापुढें पाहूं कोणाची प्राज्ञा आहे तुला तसें वागविण्याची. या प्रतापाशीं गांठ आहे. दे तो पूर्वीचा राग सोडून.

**त्राटिका**-राग सोडून देऊं ? कां बरें ? मला वाटेल तर रागावेन नाहीं तर रडेन, नाहीं तर हंसेन, मला वाटेल तसें मी करणार. माझी मी मुखत्यारीण आहे. असेंच कर, तसेंच कर, असें कोण मला सांगणार आहे ? लग्न लागलें असलें तरी ही त्राटिका एखाद्या मुळूमुळू रडणाऱ्या पोरीप्रमाणें आपल्या ताटाखालचें मांजर होऊन बसणार नाहीं. हवी असेल तर पतकरा, नाहीं तर सोडा. बाबा, तोंड कां असें करतां ? मी कांहीं वाईट करीत नाहीं, जशास तसें आपण नका या भानगडींत पडूं. आपले उपकार झाले तेवढे बस्स झाले.

**प्रताप०**-मामासाहेब, ऐकलेंतना हें ? तिची मर्जी नाहीं आपले येथें रहावयाची; मग उगीच कां आग्रह करतां ? मीं तुम्हांला अगोदरच सांगितलें नाहीं, कीं तिच्यासारखी समजूतदार बायको हजारांत एक सांपडेल. ती पतिव्रताधर्म चांगला जाणते. जिकडे नवरा तिकडे ती. आतां तुम्हांला माझ्यासंबंधानें ती जें बोलते तें विपरीत भासेल. पण तिच्या आमच्या दरम्यान मुळीं अशीच भाषा बोलण्याचें ठरलें आहे. पण प्रिये, तूं नको उगीच त्रास करून घेऊं.

**त्राटिका**-( वेडावून दाखवून ) आपण म्हणतां तसेंच बरें. बाबा, असे भुतानें घेरल्यासारखे आ पसरून उभे काय राहिलां ? कमळे, चला आंत. आतां आपापल्या उद्योगाला लागावें. सारीच मेली चेष्टा झाली आहे.

**प्रताप०**-मंडळी, ऐकलेंत ? आमच्या राणीसाहेबांकडून काय हुकूम होतो आहे तो ? लागतां कीं नाहीं आपापल्या उद्योगाला का ओढूं फोकरे ! तुम्हीं कितीही मोठे असलां तरी आमच्या राणी-

साहेबांचा हुकूम मी तुह्मांस मोडूं देणार नाहीं. चला निघा. हं चल्लते व्हा. माझी आनंदी माझ्याबरोबर येणार. ( तिचा हात आपल्या हातांत अडकवितो. ) तिची इच्छा नाहीं याउपर या घरांत रहावयाची. का, डोळेसे वटारूं लागलां? मी तुह्मांला निक्षून सांगतों कीं आनंदी व मी आतां एकजीव झालों. जेथें मी तेथें ती. जेथें ती तेथें मी. माझी धनदौलत, माझें रत्नभांडार, माझें सुखाचें आगर, माझे पंचप्राण काय ती आनंदी. माझा हा खजिना कोण चोरणार ? तिला माझ्यापासून दूर कोण करणार ? कोणाची माय व्यायली आहे पुढें येण्याची ? मी आतां सशक्तिक व सायुध आहे. अरे चोरांनो, पिल्या बघतोस काय? काढ तलवार आणि हो दरवाजाकडे. तिच्या मनांत नसत्या कल्पना भरवून तिला पातिव्रत्यापासून ढळावयाला लावावयाचा यांचा बेत आहे. कांहीं चिंता नाहीं. दाखवूं यांना हात. प्रिये, चल हो पुढें पिल्याच्या मागून.

[ **पिल्या** पुढें व **प्रतापराव** मागें अशा थाटानें **आनंदी**ला ढकलीत नेतात, **त्राटिका** रडत ओरडत जाते, मंडळी एकमेकांकडे पहात राहतात.

# अंक चवथा.



## प्रवेश १ विजयपूर,—प्रतापरावाच्या घरापुढें

**पिल्या** येतो.

**पिल्या**-ही चाकरी न्हव, ह्यो कार हाय बगा. आज सकाळशुन हकुडन तकड आन् तकुडन हकड करता कस्ता जीव अक्षी बेजार झालाया. रस्ताबी नीट हाय का ? गुडग्याइक्का चिकूल. ह्यो पाय काडावा त त्यो घसाकुदिन आंत जातुया. घोडीं थकूनशान चालनातबी. आन् धनीसाब मलाच दवडत्यात ह्मोरं ! आतां ह्यें बगा, आमी आणि धनीसाब दोगबी वाट चालतुया. दोगांस्नींबी सारखाच

सरम आल्याती. असं असूनशान् धनीसाब काय हुकूम करल्यात, "पिल्या ल्येका, घरीं जा म्होरं. आन् शेकोटी बिकोटी तयार कराया सांग. थंड लई कडाक्याची पडलीया. संमदी तयारी ठेवं." मी म्हंगतो ह्यो का न्याव हाये? मीच म्होरं कशापायी जावं? माजं आंग कमी दुखतया व्हय? का आमा चाकरांची आंगच न्हाइत जनू! बर, पन् असा बोलत न्हायलो तर येत्याल धनी आन् ओढत्याल कोरड. तुक्या, अर तुक्या, तुक्या, तुक्या होत्. अर म्येलास कीं काय? ये बिगिबिगि, न्हाइतर ह्यो झालो बग हतच थंडगार. काय थंड पडलीया. हातपाय अकाडल अक्षी.

**तुक्या** येतो.

**तुक्या**–अर, कोन हारळ्या मारतया त्ये? आं नाईकसाब, आपली का सवारी ही? आन् कवा येनं केलं? आपला शबुदबी वळखू येईना अक्षी. आन् झालं तरी काय आपनास्नी? आन् असं घोडावानी काय बोललासा? आन् धनीसाब कुट हायती? आन आमच्या नया बाईसाब? आन् सार खुशाल?

**पिल्या**–अर हकड ये अदुगर. तुला सांगतो संमदं. ( **तुक्या** येतो, त्याला दोनचार कोरडे ओढतो. ) ल्येका, गाढिच्या, मी मरतुया थंडीनं. हातपाय अक्षी गार पडल्यात. आन् याचं चाललया त्वांड. ह्येंचं काय झालं? त्येंचं काय झालं? त्ये कुटं हायती? ह्ये काय करल्याती? आलंका तुझ्या ध्यानांत का दाऊं आनीक?.

**तुक्या**–नग, नग, नग, नग. मला इक्कं पुर. पन आपला शबुद असा का येतोयाजी?

**पिल्या**–अर मी न्हव ह्यो. ह्यें माझं भूत हाय. मीं वाटंत थंडीनं कवाच मरून ग्येलो न् हुं काय? व्होवं तर हात लाऊन बग. हैका कुट ऊब? अक्षी थंडगार. अर या थंडीनं मोझं धनी इक्त कडक पन् त्येबी अक्षी नरम आल्याती. मऊ लोन्यावानी बग. आन् आमच्या बाईसाब थंड पडल्याती.

**तुक्या**–उं? बाईसाब थंड पडल्याती? ( रडक्या स्वरानें ) मंग लई

चंगाळं झालं. ह्येंच लगीन झालं आन् ह्यो असा परसंग आला !

**पिल्या**–थूः गाडवा ! अर थंड झाल्याती ह्मंजी मेल्या न्हाइत. जित्या हायता, पन् त्येंच हातपाय हालत न्हाइत. न्हाइतर कशा बग फुट्टाण्यावानी उडत व्हत्या. पन् ह्यें बग. अदुगर बोलत उभा न्हाऊं नको. आग लाव. अब्बीके अब्बी. जकड तकड आगी-आग होऊं दे बग. न्हाइतर धनीसाब आल ह्मंजी तुझ आगीशि-वायच फुट्टाण करतील.

**तुक्या**–आज नाईकसाबांनीं चिलीमविलीम झोकलीया जनू ? घराला आग लावू व्हय ?

**पिल्या**–लई त्वांड सोडतुयास ? तुझ्या बान चिलीमविलीम व-डली असल. थांब, तुझी काडतो चिलीम. पन ह्यो बग मला ये-ऊन इक्का वखुत झाला, अक्षी थंडीनं काकडून गेलोया. आन तू लांबलांब गोष्टी सांगतुयास ! हायका न्हाइ तुला रीतबीत ठावी ? “ नाईकसाब, आमंदि या, हत बसा. अंगबिंग रगडूंका ? वाइच शेका ” असं कांहीं मला ह्मंगावं कीं न्हाइ ? हरामखोर झालास व्हय ! ( त्याला कोरडा मारतो. )

**तुक्या**–चुकलो, चुकलो जी नाईकसाव. माफ करा. पन् बा-ईसाब लई कडक हैती ह्मन ?

**पिल्या**–कडक व्हत्या. पन् या थंडीच्या कारनं अक्षी थि-जल्याती. आन ह्यें बग आतां लई बोलूं नगस. न्हाइतर धनी-साब आल आन शेकोटी नसली म्हंजी या थंडीच्या कारानं हो-त्याल गरम, आन् तुलाबी करत्याल कोरड्याखालीं नरम गरम आन् मंग तूं पडशील थंड.

**तुक्या**–नाईकसाब, तुमी लई मौज करतान काय ? मला ह्यें तुमचं नरम, गरम, थंड कायबी कळत न्हाइ बगा.

**पिल्या**–बर पन अदुगर शेकोटी तयार हाय का न्हाइ. बोल ?

**तुक्या**–शेकोटी तर ऐशी तय्यार केलीया की धनीसाब, बाईसाब, तुमी आन् धाबीस मानसंबी भाजून निघत्याल. पन् अदुगर खबर सांगाजी नाईकसाब.

आम. **पिल्या**–आं लेका. धनीसाबास्नी आन् बाईसाबास्नी ,आन्

मलाबी भाजून काढनार व्हय तूं! (चाबूक उडवतो.) आन् मंग पोटांत काय काट भरणार? आं!

**तुक्या**–तसं न्हवंव; ईस्तु लई करून ठेवलाया. पन् खबर बोला, राव.

**पिल्या**–त्यें एक झालं. पन् मुतपाक संमदा तयार हाय का? आन् दिवानखाने म्हालबिल संमदे झाडून साप करून बिच्छाता घालून ठेवल्याता का? चादराबिदरा सपेत हायतना? न्हाइ तर बग धनीसाबांचा हिसका हाय तो.

**तुक्या**–संमदं कसं अक्षी झकपक करून ठेवलंया. मुतपाकबी तयार हाय. पन् अदुगर खबर सांगा.

**पिल्या**–बर तर मग ऐक. घोडं अक्षी थकलं बग आन् धनीसाब आन् बाईसाब यांच्यामदी वाकडं पडलं न् हुं काय?

**तुक्या**–आन् इक्त्यांतच. ह्यें तर लई वंगाळ.

**पिल्या**–हा ल्येका गाडवा! इक्कंबी तुला कळना. अर, माजं घोडं थकलं तसं धनीसाबांचंबी थकलं आन् त्यें ठ्येचाळलं आन् धनीसाब पडल हकड, आन् बाईसाब पडल्या तकड आन् घोडं पडलं मदि वाकडं. आलं का ध्येनांत?

**तुक्या**–आन् त्येंसनीं लागलं बिगलं तर न्हाइ?

**पिल्या**–हकड कर तुझा कान म्हंजी सांगतों.

**तुक्या**–(कान पुढं करून) हुं, काय सांगतासा सांगा बगूं? (पिल्या त्याचा कान उपटून तोंडांत मारतो.) आं नाईकसाब, ही कोण थट्टा जी? लई चटका बसला की.

**पिल्या**–हायच तशी चटकदार काहानी. आन् कान का उपटला म्हुन न्हाइ इचारलस?

**तुक्या**–व्हय. त्यें मी अक्षी इसारलों बगा.

**पिल्या**–आन् म्हुनच कान उपटला. तुझं ध्यान लागावं म्हुन. बरं, आतां ऐक खबर. माज धनीसाब आन् बाईसाब व्हतीं एका घोड्यावर. त्येंनीं घ्येतली व्हती तिला म्होरं.

**तुक्या**–काय सांगतासा! धनीसाब का भिकारी हायती व्हय? येका घोड्यावर दोग कशापायी बसत्याल?

**पिल्या**-आन् बसल तर तुझ्या बाचं न्हाइ तर माझ्या बाचं काय ग्येलं ? पन् गड्या आतां तुला ती संमदि खबर न्हाइ कळायची ! मर्दि बोलला नसतास तर ? पन् व्हाअवत कुटं ? कुत्र्यावानी ज्यांत त्यांत त्वांड घालाया होवं ! तू असं आडावलं नसतंस तर आमचं घोडं बग कसं अक्षी जोरांत चाललं असतं. धनीसाबांचं घोडं खालीं कसं पडलं; बाईसाबांचा पाय त्येच्या खालीं कसा घावला; त्येंना थतंच टाकूनशान धनीसाब मला माराया कस धावल; आन् त्या पडल्या म्हुन त्येंनीं मला कसं बदाड बदाड बदाडलं; आन् मंग मी कसा गाडवावानी वराड वराड वराडलों; आन् बाईसाब कशा रड रड रडल्या आन् मला सोडवाया आल्या; आन् धनीसाबांच्या पायाबी पडल्या; छेः गड्या, घालविलीस तू सारी मजा ! आतां ह्यो मरद त्यांतलं कायबी सांगनार न्हाइ बग.

**तुक्या**-अव नाईकसाब, मी सांगूं का तुमासनी येक काहानी ?

**पिल्या**-हुं, सांग बगूं.

**तुक्या**-येक पिल्या म्हुन व्हता खुसमौजा गडी. लई चांगला नव्हता बगा. पन् त्याला येक व्हती ख्वाड, लई दोड ख्वाड !

**पिल्या**-कोनतीरे ती ?

**तुक्या**-आन् दुसरी कोनती ? खोटं बोलायची. लई थापाड्या बगा. ती बया लई वंगाळ, खटकूळ हाय म्हुन सारं जग बोलतंया, आन् तुमी म्हनतासा ती त्येंच्या पाया पडली आन् कशापायीं तर म्हन तुमास्नी सोडवायापायीं. चेहेरा बगा यांचा !

**पिल्या**-ठीक हाय चोरा. काडीन याचा वचपा. आता झालीया येळ धनीसाब यायाची. संमद्या गड्यांस्नी बोलाव बगूं. धनीसाब आलं म्हंजी त्येंच्या म्होरं यांचं हातपाय कस लटलट कापत्यात ते तुला दावतो बग आतां !

**तुक्या**-अर दगड्या, म्हशा, बेरड्या, अर हकड या हकड. नाईकसाब आल्याती न्हव. त्येंसनी रामराम करायचा न्हाई का ल्येको ? आन् आता आमच धनीसाब आन् आमच्या नया बाईसाब येत्याल त्येंसनी म्होरं जायाचं न्हाका ? चला बिगिबिगि,

**पिल्या**-कायर, म्होरं कशापायीं जानार ? का धनीसाबांस्नी

रस्तबिस्ता दिसत न्हाइ व्हय? आन् म्होरं जायचा तूं कोन "हुकूम" करनार र कोंबडीच्या? मी का म्येलो व्हय? धनीसाबांच्या म्होरं म्होरं करून माझी जागा उपटायची हाय जनू तुला! थांब दावतो तुला माझा हिसका. ( कोरडे उडवितो. )

**तुक्या**-ह्ये कायजी नाईकसाब? ( त्याच्या अंगाला बिलगतो. )

तीन **गडी** येतात.

**गडी**-रामराम, नाईकसाब रामराम! अर चला तो तुक्या बगा कसा नाईकसाबास्नी भेटतुया. आपुनबी तसंच करूं या कीं. ( सगळे **पिल्या**ला बिलगतात. )

**पिल्या**-अर, हाय काय ह्यें? तुमचा ब्योत मला मारायचा हाय व्हय? का निघता का न्हाइ बाजूला? चला व्हा दूर. न्हाइतर ओडतो बगा कोरड एकेकाच्या पाटीवर धा धा.

( बाहेरून **प्रतापराव** " **पिल्या, तुक्या**, अरे हरामखोरांनो, कोठें गेला सारे? " असें ओरडतो. )

**सगळे**-आं? धनीसाब आल जनू? आपुन न्हाइबुवा आतां म्होरं जात. ( चोघे चार दिशेला जाऊन दडतात. **पिल्या** एका कोपऱ्यांत उभा राहतो. )

**प्रतापराव** आणि **त्राटिका** येतात.

**प्रताप**ः-अरे, हे सारे हरामखोर चाकर गेले तरी कोठें? तरी मी जातांना हुकूम करून गेलों होतों, कीं आह्मीं यावयाच्या वेळीं दाराबाहेर ठाकठीक पोषाख करून तुमच्या राणीचें, या माझ्या हृदयस्वामिनीचें, स्वागत करा. आज माझ्या या मनमोहिनीचा गृहप्रवेश कसा थाटानें व्हावयाला पाहिजे होता. कारण ही गृहलक्ष्मी आल्यानें माझ्या घराचें भाग्य उदयाला आलें आणि तिचा असा स्वीकार? पिल्याला मुद्दाम तेवढ्याकरितां पुढें पाठविला तोही गीढव कोठें दिसत नाहीं. प्रिये, या चाकरांच्या कसुरीबद्दल मला फार वाईट वाटतें! थांबा, चोरांनो, एकेकाची चामडी लोळवतों. हा कोणरे कोपऱ्यांत चोरासारखा दडला आहे? अरे, हा पिल्या.

गद्ध्या, ये असा पुढें. (त्याला पुढें ओढून दोन चार चाबकाचे फटके ओढतो. तो "म्या काय केलं जी" म्हणून निसटून पळून जातो व एकेका गड्याला चाबूक मारीत पुढें आणतो. )

**पिल्या**-ह्ये बगा सरकार, सार चोर ह्मोरं उभ केल्याती. मी हत आलो आन् बगतो तो कायबी तयारी न्हाइ. मंग म्याच शेकोटी तयार केली, झाडून काडलं, बैटका घातल्या आन् या संमद्यांना धरुनं आनून हत उभ केल. आन् त्येंसनी सांगितलं की आता धनीसाब येत्याल, त्येंसनी सामोरं जाया व्हावं, बाईसाबांस्नी थाटानं घरांत आनाया व्हावं, म्हुन किती सांगितलं; पन योक ऐकंल तर शपत. ह्मशाचीं ह्मन शिंगंच मोडल्यालीं, तसं न्हाइ, मुंडासं मोडल्यालं. दगड्याच डोसक दगडावानी जड झालं व्हतं, केरड्याचा अंगराखा चोरांनीं चोरूनशान नेला व्हता. मंग मी काय करूं धनीसाब ?

**प्रताप०**-तें खरें; पण तुला तर कोणीं चोरलें नव्हतेंना ? मग तूं कां नाहीं पुढें आलास तुझ्या नव्या राणीसाहेबांना घोड्यावरून खालीं उतरावयाला ? ( त्याच्यावर चाबूक उगारतो. )

**पिल्या**-कार हरामखोरांनो आता गप्प का ? तोंडाला गुडदी बसली व्हय ? थांबा, ही बगा आतां कशी काडतो एका हिसक्यासरशी. ( त्यांच्यावर चाबूक उगारून पुढें होऊन मारतो. ते आंत धडपडत पळून जातात. गर्दींत **प्रतापरावा**चा चाबूक याला व याचा **प्रतापरावा**ला लागतो. ) आय् , आय् , आय् , धनीसाब, लई जोरानं लागलं बगा. चामडंच निघालं.

**प्रताप०**-अरे चोरा, मला तुझा चाबूक लागला तें जिरविण्याकरितां बाहणा करतोस होय ? बरें आहे. जाऊं दे. ही वेळ त्यांचा विचार करावयाची नाहीं. माझ्या प्रियेला फार भूक लागली आहे. अगोदर मुतपाकखान्यांत जाऊन तयारी झाली असली तर ताटें मांड.

**पिल्या** आंत जातो.

प्रिये, ये, मला कडकडून भेट. आजपासून हें घर तुझें. येथील स्वामिनी, अधिदेवता तूं. तुझा महाल तर असा सजविला आहे

कीं, तो जर स्वर्गींच्या अप्सरांच्या दृष्टीस पडला, तर तुझा त्या खचीत हेवा करतील. तुझें मंदिर हेंच माझें देवघर. रात्रंदिवस त्या ठिकाणींच हा भक्त तुझी आराधना करीत राहणार. बरें पण हा मी बोलत काय उभा राहिलों? तूं भुकेनें अगदीं व्याकूळ झाली असशील. छेः किती मी निर्दय! हें पहा, या कोमल गालावरचे गुलाब भुकेच्या व श्रमाच्या तापानें कोमेजून गेले. चल आंत. वाटेचीं वस्त्रें टाकून देऊन नवीं नेस. वस्त्रें इतकीं भरलीं आहेत कीं कोणतें नेसूं आणि कोणतें टाकूं असें तुला होईल. हातपाय तोंड धुवून होतें आहे तों ताटें तयार. चल, चल लवकर. अहाहा, काय पक्वान्नांचा घमघमाट सुटला आहे! असली भूक आणि असलीं पक्वान्नें! आज खरोखरच रंग आहे! [आंत जातात.

**पिल्या** बाहेर येतो.

**पिल्या**–अर तुक्या, काय हाय तरी काय? अजून हत कायबी तयारी न्हाइ? आन् आतां धनीसाब येऊन खेटरं देत्याल कीं. न्हाइतर धा खमंग कोरडे ओढत्याल! खरंच, मगा जवा माझा ह्यो आसूड धनीसाबांस्नी लागला, तवा मी लई चराकलो. आता त्ये माजा जीव घ्येनार असंच मी समाजलो. पन् नशीब हाय नशीब! अर पुन् ह्यो तुक्या का येईना? अर तुक्या, घाई कर. त्यो झकपक गालिच्या आणून हत घाल आन् ती शामदानं घ्ये बग. (**तुक्या** गालिच्या व शामदानें घेऊन येतो. गालिच्या घालून शामदानें नीट ठेवतात.) आन् त्या मुतपाकिच्याला म्हनावं, ताटं बिगिबिगी तयार करून लावून दे. (**तुक्या** जातो. **सोबळेकरी** दोन ताटें आणून ठेवतो.) अर, चला बाजूला. ह्ये आल बगा धनीसाब. [बाजूला जातात.

**प्रतापराव व त्राटिका** येतात.

**प्रताप०**–वाः! काय खमंग वास सुटला आहे तरी हा! छेः, आपल्या तोंडाला तर पाणी सुटलें. (गालिच्यावर बसून) प्रिये, ये. तूं अशी उभी कां? तूं तर येथील मालकीण. ये अशी जवळ

बैस. ( ती जवळ येऊन लाजून उभी राहते. ) हं. समजलों तूं बसत नाहींस याचें कारण. कायरे ए गद्ध्यांनो, तुमच्या अकला गेल्या कोठें? हरामखोरांनो, तुह्मांला दोन ताटें मांडावयाला सांगितलें कोणीं? चला हें एक अगोदर तर आंत न्या. (पिल्या एक ताट उचलून आंत नेतो. ) आज माझी प्रियी व मी एका ताटांत जेवणार. आजच कां? दररोज तसें करणार. कारण ती माझी अर्धांगी झाली आहे. ( तिला ओढून आपल्याजवळ बसवितो. ) खरोखर, मी आज मोठा धन्य. असलें हें रत्न लाभलें ह्मणून मला किती पण आनंद झाला आहे ! पण प्रिये, तूं बोलत कां नाहींस ? अरेरे, किती भुकेनें व्याकूळ झाली आहे ही ! मी आपल्याच आनंदांत गर्क होऊन हिची ही स्थिति विसरलों. प्रिये, आज तूं आपला हात खरकटा करूंच नको. हा प्रताप तुला भरविणार. ( ताटांतील एक पुरी उचलून ) अरे, हें काय आहेरे हें? ही का पुरी ? पिल्या, बोलाव त्या हरामखोर सोवळेकऱ्याला.

**सोवळेकरी** येतो.

कायरे हजामा, पाजी, लुच्चा, गद्ध्या, ही पुरी तुझ्या बापाच्यानें तरी खाववेल काय ? हिच्यावर घणाचे घाव घातले तरी ही फुटावयाची नाहीं, करवतीनें कापावयाची नाहीं, कीं विस्तवांत जळावयाची नाहीं. ही घे चोरा, तूंच खा कशी खातोस ती !- आणि हें काय ? ही खीर वाटते ? यांत बुडी मारून एक तरी गव्हला हातीं लागतो आहे का ? जास्त गव्हले घेतले असतेस तर तुझ्या बापाचें कांहीं वेंचलें असतें कीं काय ? हे पहा कबाब ! अहाहा ! अरे कुत्र्यांनो, आमचीं तोंडें ह्मणजे का तोफा आहेत ह्मणून तुह्मीं हे गोळे तयार केले आहेत त्यांत ठासावयाला ? या रशांतल्या नळ्या पहा. अबबबब ! माझी प्रिया का कुत्री आहे ह्मणून हीं इतकीं हाडें तुह्मीं यांत घातलीं आहेत ? बस्स, तें कांहीं नाहीं. सारे चोर माजले आहेत. यांचीं हाडें अगोदर चांगलीं नरम करून यांच्याच नळ्या बाहेर काढल्या पाहिजेत. पिल्या, तुक्या, ह्मश्या, चला, या पुढें सारे.

ते बाहेर येतात.

**त्राटिका**-हा काय गोंधळ हा! अगोदर जेवावयाचें होतें आणि मग पाहिजे तर त्यांना शिक्षा करावयाची. पण खरेंच त्यांना मारावयाचें काय ह्मणून? जिन्नस कांहीं वाईट झाले नाहींत. वास तर चांगला येतो आहे. ही पुरी कांहीं वाईट दिसत नाहीं. (पुरी उचलते)

**प्रताप०**-हं हं हं! प्रिये, हें काय? हा प्रताप तुझ्या सेवेला तत्पर असतां तूं कशाला श्रम घेतेस? (तिच्या हातांतील पुरी घेऊन) हीच का पुरी तूं चांगली ह्मणतेस? हिला तर घाणेरड्या तुपाची कोण घाण येत आहे! (पुरी फेंकून देतो.)

**त्राटिका**-आपल्याला घाण येत असेल तर आपण नका खाऊं. मला बाई फार भूक लागली आहे. तेव्हां पदार्थ कसेही असले तरी मी खाणारच. अगदीं चार दिवसांचे शिळे असले तरी मला चालतील.

**प्रताप०**-अग, तुला चालतील तर काय झालें! तूं आहेसच तशी समजूतदार बायको! पण लोक मला काय ह्मणतील? आजच तुझा गृहप्रवेश आणि त्याच दिवशीं हा थाट! ह्मणजे संसार चांगल्या मुहूर्तावरच थाटला ह्मणावयाचा! काय करूं? माझ्या अंगाची कशी आग होऊन गेली आहे. यांना ही अशी दांडगाई करावयाला आणि बेपर्वाई दाखवावयाला आजच कसें सुचलें कोण जाणे! तूं जवळ आहेस ह्मणून नाहीं तर यांची चामडीच लोळवली असती. अरे ए गधड्यांनो, आतां तुमची धनीण काय ह्मणाली तें ऐकलें नाहींत वाटतें! उचला हें ताट. हुं, अजून नाहीं उचललें? घ्या तर मग हें बक्षीस! (गडी ताट उचलावयाला पुढें येतात. त्यांच्या अंगावर ताटेंवाट्या फेंकतो.)

**त्राटिका**-हें काय असें हें वेड्यासारखें करावयाचें तें! काय त्या अन्नाला झालें होतें? चांगलें सुग्रास अन्न कांहीं तरी निमित्यानें डोक्यांत राख घालून फेंकून द्यावयाचें, याला ह्मणावें तरी काय? सारा मेला पोरखेळ! गप्प बसावें तों अधिकच. मेऊ सांप-

डलें म्हणजे लागल कोंपरानें खणावयाला. मला हें साफ खपाव-याचें नाहीं. अरे, कोण आहेरे तिकडे? आणा एक ताट तयार करून. मी तें अन्न खाणार. आपल्याला नको असेल तर खुशाल घोंटभर पाणी पिऊन जाऊन निजा. मेली वाटेची कोण दगदग झालेली; पोटांत भुकेनें कांहीं कहर उडवून दिला आहे; पण इ-कडे आहे का कांहीं त्याचें? हें पहा, मी कांहीं जेवल्याशिवाय येथून उठावयाची नाहीं. मी आतां येथील मालकीण झालें आहें!

**प्रताप०**-(हंसून) प्रिये, तूं मालकीण आहेस, म्हणूनच तर मला यांचा इतका संताप आला आहे. या शिंच्यांना इतकें दे-खील कळूं नये का, कीं तूं त्यांची यजमानीण आज घरीं आलीस तर बोवा चांगलें गोड सुग्रास अन्न करून तुला घालावयाचें? या साऱ्या चोरांची उद्यां गठडी वळतों. अरे ए बेरडांनो, द्या टाकून तें सारें अन्न! असलें जड आणि कच्चें अन्न माझ्या या नाजूक प्रकृतीच्या प्रियेला खावयाला घालून तिला आजारी करावयाचें तुमच्या मनांत आहे होय? मी आत्तां आंत जाऊन, प्रिये, तुझ्या-करितां छानदार हलकी कण्हेरी तयार करून आणतों. पचनाला ती फार उत्तम, आणि वास्तविक पाहतां तुह्मां आह्मांला आज अ-न्नाची काय जरूर? मला तर तुझ्या तोंडाकडेच पहात रहावेंसें वाटतें. भूकतहान मग कांहीं आठवत नाहीं. चल प्रिये, आप-ल्या महालांत जाऊं. [ तेथील पाण्यानें हात धुवून तिला आंत घेऊन जातो. ]

**पिल्या** पुढें येतो.

**पिल्या**-झाला आमच्या धनीसाबांचा अंमल सुरू! ह्यो मर-द या बयाला आज कायबी खाऊं की पिऊं देत न्हाइ! तिला अक्षी उपाशी ठेवून हा वठणीला आणणार. लई भूक लाग-लीया बयाला. त्वांड कसं अक्षी चिमनीवानी होऊन गेलंया. याला ह्मन भूकतान काय न्हाइ. आन् अस धा धा दीस उपास काडाव लागल म्हुन ह्यो का डगलोया? यानं असं मौजेखातर कितीदा केल्याती आन् मलाबी घातल न्हवत?

**तुक्या** येतो.

कायर तुक्या, काय हाय खबर? धनीसाब कुटं हायती? आन् बाईसाब काय करत्यीती?

**तुक्या**-अर त्यें काय इचारू नग बग. बाईसाबाकड बगितल झंजी मला कसं बंगाळ वाटतीया. त्या बयाची मला दया येते. दोघं आतां झालांत बसलीं हायतं. ती कशी झोपबिगार अक्षी जेरीला आलीया, आन् हा मारतुयाच तिला थापा. तुला ह्यें होवं का त्यें होवं, असं जें काय त्येनं चालवलंया! ती बया कायबी बोलत न्हाइ. पन् याला कुट होवं हाय त्यें? त्येच त्यें गुराळ चालूच हाय. आन् मधून मधून बग काय वराडतोय, काय आराडतोय. तुमा आमास्नी लई खांडगाळ्या शिव्या देतुया. ती पन् अक्षी भेदरून गेलीया. हकड तकड पळाया वाट हायका म्हुन बगतीया. पन ही सवारी बसली हायना अक्षी दारांत. ह्यो नवरा न्हव राकुस हाय राकुस. आपुन तर बोवा त्येची बाईल कधीं व्हनार न्हाइ, देवाच्यान.

**पिल्या**-थूः ल्येका. बाप्ये कधीं बायका व्हतात व्हय? आन् शेण्याच्या कांद्या. धनीसाबांनीं बाइसाबांस्नी कायबी केलं तर त्यांत तुझ्या माझ्या बाचं काय ग्येलं? ल येका, तुला अशी एकांदी आवा मिळाली झंजी समजल त्येचं सुक! अर, ती बया तुला गरीब दिसतीया पन् घरीं जवा व्हती तवा तिनं आपल्या बापाला आन भैनीला तरास देऊन देऊन बेजार केलं व्हतं बग. अर पन् हुं. धाव मार. त्ये आल बग धनीसाब. [ जातात.

**प्रतापराव** येतो.

**प्रताप०**-ठीक आहे! आमच्या राज्याचा आरंभ तर मोठ्या ऐटींत झाला. तिला नरम आणण्याकरितां जो मी प्रयत्न करणार त्याचा पाया चांगला व शिताफीनें घातला गेला. माझी खात्री आहे कीं, हा पठ्या जिंकणार. प्रकरण जरा कडक तर खरें! तिच्या त्या नजरेकडे पाहिलें कीं बहिरीससाण्याच्या नजरेची आठवण होते. हिची नजर थेट तशीच कुर्रेबाज, रागीट

आणि धर्मकावणारी. पण ह्मणावें मींही बाहरीससाणे पाळले आहेत; त्यांच्या अंगांतील कडवटपणा काढून टाकून त्यांस शिकवून असे तयार केले आहेत कीं, अगदीं धन्याच्या हुकुमांत. तशीच हिलाही तयार करीन. तरी पण हिच्या अंगांतली धमक नाहींशी करतां उपयोगी नाहीं. कारण त्या धमकींतच कायतें सत्व आहे. नुसत्या मिळमिळीत, नवऱ्याच्या अगदीं आज्ञेंत वागणाऱ्या, स्वतःच्या अकलेचा जोर बिलकुल नाहीं, अशा बायका काय कामाच्या. फक्त तिचा तो कुर्रा आपल्यावर चालूं नये इतकें झालें ह्मणजे बस्स ! त्याला पहिला उपाय तिला उपाशीं ठेवावयाचें. पोट भरलें कीं स्वारीचें काम झालें. मग कोण कोणाचा लागतो आहे ! तसेंच तिला झोंप ह्मणून येऊं द्यावयाची नाहीं. आतां ती कण्हेरी पिऊन पलंगावर जाऊन जों आडवी होते आहे तों आमची स्वारी तेथें तयार. ती सहजच पलंगावरून उठून उभी राहील, कीं बिछान्यापाशीं जाऊन गादी खुपतेच, पलंगपोस धुतलाच नाहीं, गिर्यांना तेलाची व घामाची घाणच येते आहे अशीं नानाप्रकारचीं नांवें ठेवून बिछाना देऊं सारा फेंकून. फक्त एक सतरंजी तेवढी तेथें ठेवावयाची. त्यावर ती आडवी झाली तरी तिला झोंप ह्मणून येऊं द्यावयाचीच नाहीं. वरचेवर जाऊन तिला कुरवाळून 'प्रिये, लाडके ' ह्मणून हालवून जागी करीन. ' झोंप लागली का ? ' 'पांघरूण तरी नीट घे, ' असें बोलबोलून तिचा डोळा लागूं देणार नाहीं. दिवसाच्या दगदगीमुळें तर तिला केव्हां हांतरूणावर अंग टाकीन असें झालें असेल, पण आजची रात्र तिला बिनझोंपेचीच काढावी लागणार. मी इतका निष्ठुरपणा करतों याबद्दल लोक मला नांवें ठेवतील. पण हा निष्ठुरपणा तिच्या व माझ्या हिताकरितां आहे. कजाग बायकोला ताळ्यावर आणण्याचा सौम्य व ममतेचा उपाय काय तो हाच ! दुसरा जर कोणाला माहीत असला तर त्याचा त्यानें प्रत्यक्ष अनुभव आणून दाखवावा. मी व माझ्याप्रमाणेंच कजाग बायकोचें जड जोखड मानेवर वाहणारे पण माझ्याहून कमी धीराचे लोक त्याचे फार फार उपकार मानतील.

[ जातो.

## प्रवेश २.–कुसुमपूरः धनाजीरावाच्या घरामागील बाग.

**कमळा** आणि **रंभाजीराव** येतात.

**कमळा**–( हातांतील पत्राकडे पाहून ) मला बाई राहून राहून मोठें आश्चर्य वाटतें. असें करावयाचें यांना धैर्य तरी कसें झालें ?

**रंभाजी**०–या असल्या स्वरूपाकरितां कोण काय करणार नाहीं ? अग, मीं देखील काय पाहिजे तें केलें असतें.

**कमळा**–इश्शबाई ! कांहीं तरी भलतेंच बोलावयाचें. आपण त्या मेल्या भागूबाईसारखेंच का ? थट्टेनें बोलावयाचें झालें तरी शोभेल असेंच बोलावें.

**रंभाजी**०–अग, माझ्या ह्मणण्याचा अर्थ नाहीं तूं समजलीस. त्यानें हें धाडस केलें, आपल्या योग्यतेकडे पाहिलें नाहीं, हा मूर्खपणा खरा. पण समज घटकाभर, मी राणोजीच्या स्थितींत असतों, वडिलांकडून आपला स्वीकार व्हावयाचा नाहीं असें समजून, तुझें मन आपलेंसें करून घेण्याकरितां राणोजीप्रमाणेंच प्रयत्न केला असता, तर माझीही व्यवस्था तूं त्याच्याचप्रमाणें केली असतीस ना ?

**कमळा**–हें काय बाई विचारणें ? मला असलें कांहीं समजत नाहीं. आपण ह्मणे तसें असतां तर ? जें नाहीं त्याबद्दल मुळीं विचार तरी कां करावा ? नाहीं तर आपल्या मनाला हव्यात तशा गोष्टी नाहींत ह्मणून उगीच मनाला दुःख व्हावयाचें.

**रंभाजी**०–अग, तसें नव्हे. ही गोष्ट नाहीं किंवा आहे हा विचार ठेव एका बाजूला. मला तुझ्या मनाची परीक्षा पहावयाची आहे. समज, तुझ्या बापानें तुला त्या रणधीररावाला द्यावयाचा निश्चय केला, आणि तुझ्या मनांतून त्याला वरावयाचें नाहीं. अशा स्थितींत तुझ्यावर प्रीति करणारा एक तरुण पुरुष तुला न समजूं देतां तुझ्या मनाची व गुणांची परीक्षा करतां यावी या हेतूनें आपला वेष पालटून तुझ्याजवळ येऊन राहिला, आणि संधि साधून आपलें हृद्गत त्यानें तुला कळविलें, तर त्याला तूं काय उत्तर देशील ?

**कमळा**-तो कसा आहे, कुलीन, सुशील, चतुर, ज्ञाता आहे कीं नाहीं हें समजल्याशिवाय उत्तर काय देऊं ?

**रंभाजी०**-ह्मणूनच ह्मणतों घटकाभर मीच तो आहे असें समज.

**कमळा**-पुरे आतां ही थट्टा. मला असें कांहीं विचारूं नये. आपलें कांहीं तरी विचित्रच विचारावयाचें. बरें पण, आपण परवां सांगितली ती गोष्ट आतांच्या या कल्पित गोष्टीशीं बरीच जुळते नाहीं बरें ? ( त्याच्याकडे वांकड्या नजरेनें पाहते. )

**रंभाजी०**-असेल, त्याचें काय ?

**कमळा**-ती गोष्ट सांगितल्यावर आपण शास्त्रांतील आधार दाखवून स्वयंवराबद्दल कायसेंसें बोलला होतां नाहीं ? मी तें विसरलें नाहीं. माझ्या मनांत तें सारखें घोळतें आहे. ( लाजून मुरकते. )

**रंभाजी०**- शाबास, तूं चतुर आहेस. माझा उपदेश तुझ्या मनावर इतका चांगला ठसला असेल असें मला वाटलें नाहीं.

**कमळा**-इतकी नको कांहीं माझी स्तुति करावयाला. शिष्याच्या मनावर कोणतीही गोष्ट चांगली ठसावयाला गुरुही तसाच चतुर आणि विद्वान् लागतो.

**रंभाजी०**-बरें तें असो. काल ती राणुबाई आली होती, तिनें आणून दिलेल्या पत्राचें उत्तर तूं देणार का ?

**कमळा**-माझ्या मनांत ती गोष्ट बाबांना कळवावी असें होतें. पण आपण सांगितल्यावरून मीं तसें कांहीं केलें नाहीं. आतां पुढें काय करावयाचें तें आपणच सांगा. तिला या वेळीं येऊन माझी गांठ घे ह्मणून मीं सांगितलें होतें.

**रंभाजी०**-बरें तर, त्या पत्रांत काय लिहिलें आहे तें वाच पाहूं.

**कमळा**-इश्श, कांहीं तरीच. मी नाहीं तें वाचीत.

**रंभाजी०**-समज, तुझ्यावर प्रीति करणाऱ्या आणि तूं ह्मणालीस त्याप्रमाणें कुलीन, सुशील, चतुर, ज्ञात्या अशा तरुणानेंच तें पत्र पाठविलें. मग तरी वाचशील का ?

**कमळा**-झाली का पुनः थट्टा सुरू !. जाऊं द्या कसें. एकदम वाचून मोकळें व्हावें हें बरें.

माझी हृदयहंसविकारी मानससरोवरिका इचे चरणसंपर्कसेवें-सीं विज्ञप्ति.

( 'कौन गली गये श्याम ' या चालीवर. )

**मूर्ति तुझी गडली ॥ हृदयीं या ॥**
**भेटिस पहिल्या सुंदरी मजला मोहनि तव पडली ॥ १ ॥**
**हसतां बसतां परिचय घडला, प्रीति तुझी जडली ॥ २ ॥**
**स्वीकारी हा दास, कशाची शंका तुज नडली ॥ ३ ॥**

तुझा नम्रतातत्सेवक,
**राणोजी.** "

झाली एकदां तृप्ति ?

**रंभाजी०**-खरेंच तुझा कंठ फार मधुर आहे. अशा एका प्रसंगानें तृप्ति कशी होणार ?

**कमळा**-पुरे, पुरे आतां, पण या पत्रावर आणखी हें काय लिहिलें आहे ? आपणच लिहिलें आहे वाटतें ? हें वाचून पहातें तर

" महामूर्खशिरोमणि **राणोजी** याच्या मस्तकीं
चरणसंपुष्टसेवापूर्वक

उत्तर.

( वरील चालीवरच. )

**युक्ति तुझी फसली ॥ जाणे मूर्खा ॥**
**भेटिस पहिल्या अक्कल तुझी सर्वहि ती कळली ॥ १ ॥**
**उठतां बसतां ध्यानीं आलें कपटें मति भरली ॥ २ ॥**
**जैसा अससी तैसा राही हीच गती उरली ॥ ३ ॥**

आपल्या प्रसादापासून दूर राहूं पाहणारी
**कमळा.** "

हें का उत्तर पाठवावयाचें ? मी नाहीं बाई त्याच्याकडे हें पाठविणार. त्याच्या हातांत माझें पत्र गेलें तर लोक काय ह्मणतील ?

**रंभाजी०**-लोक काय म्हणणार ? तुझ्या अकलेची तारीफ करतील व त्या मूर्खाला खासें फजीत केलें ह्मणून ह्मणतील. पण ही पहा ती बाई आलीच वाटतें.

**राणोजी दासीचा वेष घेऊन येतो.**

**राणोजी०**-बाईसाहेब, त्या पत्राचें उत्तर देतांना ?

**कमळा**-हें घे. त्या पत्राच्या पाठीवरच उत्तर लिहिलें आहे. (पत्र देते.)

**राणोजी०**-असें काय ? (उत्तर वाचतो.) ठीक, ठीक. अग पोरी, या पुराणिकावर तूं भाळली आहेस खचित. थांब, तुझ्या बापाला जाऊन सांगतों.

**रंभाजी०**-(**राणोजी**च्या डोक्यावरचा पदर एकदम काढून) वाः राणूबाईचा एकदम राणूबोवा झाला. मोठाच चमत्कार ! मला कालच संशय आला होता.

**राणोजी०**-मला तुझा संशय पहिल्यापासूनच होता. थांबा, तुह्मां दोघांना आतां चांगलें फजीत करतों. हा निघालोंच धनाजीरावांकडे.

**रंभाजी०**-(त्याचा पदर धरून ओढून) कोठें चाललास ? थांब, अगोदर तूं केलेल्या या अपराधाचें प्रायश्चित्त भोग आणि मग जा कोठें रडत जावयाचें असेल तेथें. (त्याच्यावर हात उगारतो.)

**कमळा**-आपण त्याला मारूं नये. ताई येथें असती तर तिला सांगितलें असतें, ह्मणजे काम झालें असतें.

**राणोजी०**-काय ह्मणतां ? त्राटिकाबाईंना सांगणार आपण ? नको बोवा त्यांचा प्रसाद पुनः ! मी जातों कसा मुकाट्यानें. सोडा मला, पायां पडतों तुमच्या. (घाबऱ्या घाबऱ्या इकडे तिकडे पाहून **रंभाजीरावा**च्या पायांवर लोटांगण घेतो.)

**रंभाजी०**-(एक लाथ मारून) जा पेंढा. खबरदार पुनः असा मूर्खपणा करशील तर.

[**राणोजी** रागारागानें त्यांच्याकडे पहात दूर गेल्यावर "पाहून घेईन" असें ह्मणून पळून जातो.

**कमळा**-मला बाई भीति वाटूं लागली आहे. हा मेला जर बाबांना जाऊन भलभलतें सांगेल, तर मग पुढें कसें ?

**रंभाजी०**-तूं अगदीं भित्री आहेस. होय, राणोजी जाऊन सांगेल कदाचित. ह्मणून काय झालें ?

**कमळा**–ठीकच आहे. परदुःख शीतळ. बाबा रागीवले म्हणजे काय करतील आणि काय नाहीं याचा का नेम आहे ? झटक्यासरशीं त्या मेल्या रणधीररावाशीं माझें लग्न करून टाकतील.

**रंभाजी०**–बरें मग ?

**कमळा**–बरें मग म्हणावयाला कांहीं वाटतें कां ? त्यापेक्षां मढ्याशीं लग्न लावलें तर काय वाईट ?

**रंभाजी०**–छेः छेः, असें बोलूं नये. रणधीरराव जरा वयानें मोठा आहे खरा, पण संसारांतलें खरें वर्म उतार वयांत जसें कळतें तसें अविवेकी तरुण वयांत कळत नाहीं. शिवाय तो घरचा सुखी आहे. तुला दागदागिने घालील. चाकरमाणसांचा तोटा नाहीं. तुला तो अगदीं जिव कीं प्राण करील.

**कमळा**–किती तरी थट्टा करावयाची ! मला कीं नाहीं हा जीव नकोसा झाला आहे.

**रंभाजी०**–इतक्यांतच जीव नकोसा झाला का ? मग कसा जीव देणार ? पण ही थट्टा राहूं दे. तुला खरें सांगतों जीव देणें हें महत् पाप. तें केलें तर देवाच्या क्षमेची आशाच करावयाला नको.

**कमळा**–मग मी करूं तरी काय ?

**रंभाजी०**–इतकी निराश कां होतेस ? काल सहज ते रंभाजीराव नांवाचे तरुण गृहस्थ, तुला मागणी केली आहे त्यांनीं, ते व मी बोलत होतों. त्यांच्या बोलण्यांत आलें कीं धनाजीरावांचा पक्का निश्चय झाला नाहीं, तरी त्यांचा बहुतेक कल तुला रणधीररावाला द्यावयाचा आहे. तरी पण —

**कमळा**–पुनः त्या मेल्याचें नांव काढूं नका. मी जर येथें राहिलें तर बाबा चट्दिशीं त्याच्याशींच माझें लग्न लावून टाकतील. तेव्हां आपलें जिकडे वाट फुटेल तिकडे जावें हाच एक उपाय दिसतो.

**रंभाजी०**–तूं एकटी का पळून जाणार ? तुझें पुढें काय होईल याचा नीट विचार केला आहेस का ? लोकापवादाची तुला कांहींच भीति नाहीं का ?

**कमळा**-लोकांपवादाची भीति धरून आपल्या जन्माचें मातेरें करून घ्यावें ह्मणतां ? तें कांहीं नाहीं. आतां दुसरा मार्गच नाहीं.

**रंभाजी०**-तुझा निश्चय ठरला अगदीं ? तूं मागें नाहींच ना घेत ?

**कमळा**-ठरला, ठरला, ठरला. आतां आपण मात्र माझ्या आड येऊं नये, एवढीच विनंति आहे. मी आपल्यापुढें पदर पसरतें.

**रंभाजी०**-बरें तर माझाही निश्चय ऐक. मी तुझ्याबरोबर येणार.

**कमळा**-ह्मणजे ?

**रंभाजी०**-ह्मणजे दुसरें काय ? मघाशीं तुला एक प्रश्न विचारला होता तो ध्यानांत आहे का तुझ्या ?

**कमळा**-ही का थट्टेची वेळ ?

**रंभाजी०**-अग, मी अगदीं खरें बोलतों आहें. थट्टा करीत नाहीं. एक तुझ्या कानांत सांगतों. ( तिच्या कानांत सांगतो. )

**कमळा**-खरेंच का हें ?

**रंभाजी०**-तुझ्या गळ्याशपथ. तूं माझ्यावर सारा भरंवसा टाक. मी तुला कधींही अंतर देणार नाहीं.

**कमळा**-मला बाई कांहीं सुचत नाहीं. आपण मला या संकटापासून सोडवा. मी आपल्याबाहेर नाहीं.

**रंभाजी०**-तुझें वचन आहेना ? नाहीं तर मी तोंडघशीं पडल्यासारखा होईन.

**कमळा**-आपल्याला वाटेल ती शपथ मी घेतें. याच पायांशपथ.

**रंभाजी०**-ठीक आहे तर मग, तूं निर्धास्त रहा. मावशीचें मात्र आपल्याला साहाय्य घेतलें पाहिजे.

**कमळा** तें काम माझें. तिचें माझ्यावर फार प्रेम आहे. लहानपणापासून ती मला आईच्या ठिकाणीं आहे. पण बाबांच्या ——

**रंभाजी०**-जा तूं आतां. मी करतों ती सारी व्यवस्था. तूं अगदीं स्वस्थ ऐस. तुला येथें येऊन फार वेळ झाला. मावशी आल्या असतील घरांत. [ **कमळा** जाते.

देवा ! खरोखरच तुझ्या कृपेनें यश मिळणार असें दिसतें. वास्तविक पाहतां त्या राणोजीच्याच मूर्खपणानें आपल्याला फार मदत

केलीं म्हणावयाची. पण अजून येसाजी कां येईना? बरें, चला, बिऱ्हाडींच जाऊन तेथें त्याला सर्व हकीकत सांगूं. त्याला किती आनंद होईल हें ऐकून!

## प्रवेश ३.-कुसुमपूर.-एक रस्ता.

**येसाजी व तान्या येतात.**

**येसाजी**-खरेंच कीं काय? काम फत्ते झालें ह्मणतोस?

**तान्या**-फत्तं म्हुन काय इचारतां? ह्यो तान्या गेल्यावर काम फत्तं आलं न्हाइ असं कंदी झालं हाय का? लई येळ रस्त्याकड नजर लावूनशान बसलो व्हतो. कायबी दिसना. अक्षी कटाळून ग्येलो. डोळ ताटल, मिटतबी न्हाइत बगा. पन जवा मी परतून यावं ह्म-नतो तवाच बगा योक ह्मातारा आला. नजरत त्यो बगा काठी टेकीत टेकीत येतोया.

**येसाजी**-शाबास! ह्मातारा तर ठीक दिसती आहे. त्याला आपल्या कामाला वळवून घेतला पाहिजे.

**(ह्मातारा येतो)**



आजोबा, दंडवत करतों.

**ह्मातारा**-मुला, तुला उदंड आयुष्य असो. सराफ्याचा रस्ता हाच का?

**येसाजी**-(एकीकडे) ह्मातारा भेमळ दिसतो. अगोदरच त्यानें मला 'मुला' म्हटलें. (उघड) आजोबा, आपण परकी दिसतां? कोठचे राहणारे?

**ह्मातारा**-मी मणीपूरचा राहणारा. रामेश्वराच्या यात्रेला निघालों आहें.

**येसाजी**-काय ह्मणतां? मणीपूरचे आपण? अरेरे, फार वाईट गोष्ट झाली!

**ह्मातारा**-कांहो, असे कां हळहळतां? मी मणीपूरचा असलों म्हणून काय झालें?

**येसाजी**-काय झालें ! अहो घात झाला ! तुह्मीं कोणत्या खडतर मुहूर्तावर निघालां होतां कोण जाणे !

**तान्या**-( एकीकडे ) यंवरे ढ्रांग ! कसा विवळतोय बगा तर खरा. कुणी ह्मणल अक्षी याचं काळिज तुटतंया.

**म्हातारा**-कांहो, खडतर मुहूर्तावर निघालों असें ह्मणतां, याचा अर्थ काय ?

**येसाजी**-तें कांहीं विचारूं नका. अहो, असे कसे तुह्मी अगदीं उघड्या डोळ्यांनीं मृत्यूच्या दाढेंत शिरलां ? माझ्या बोलण्याचें तुह्मांला इतकें आश्चर्य वाटतें, त्यावरून तुह्मांला अलीकडे तुमच्या राजाच्या आणि आमच्या राजाच्या दरम्यान द्वेष वाढल्याचें माहीत नाहींसें दिसतें ?

**म्हातारा**-छेः हो ! त्यांतलें मला कांहीं कळलें नाहीं. मी आज चार पांच महिने हिंडतों आहें. कशामुळें द्वेष वाढला ? आणि मला त्यापासून कशी भीति ?

**येसाजी**-सांगतों ऐका. आमच्या गांवचे कांहीं व्यापारी तुमच्या राजाच्या हद्दींत असतांना तुमच्या राजानें त्यांच्याजवळ होतें नव्हतें तेवढें सारें बुचाडून घेऊन त्यांना परत धिंड काढून हांकून लावलें. ही खबर आमच्या सरकारास पोंचतांच त्यांनींही हुकूम फर्माविला, कीं मणीपूरचा इसम जो कोणी ह्या हद्दींत सांपडेल त्याला पकडून एकदम सुळीं दिला जाईल.

**म्हातारा**-खरेंच कीं काय ? अरेरे ! देवा, काय हा माझ्यावर प्रसंग आणलास ! मी निघालों तेव्हां खडतर वेळ असावी खरीच. झालें; संपली माझी यात्रा. मी आपल्या पोरांबाळांना अंतरलों. ( खालीं बसतो. )

**येसाजी**-खरोखरच असा प्रसंग तुमच्यावर वृद्धापकाळीं आलेला पाहून मलाही फार वाईट वाटतें. ( डोळ्याला धोतराचा पदर लावतो. )

**तान्या**-( एकीकडे ) बगा कसा कावा हाय गुलामाचा ! डोळ्यांत एक टिपूस असल तर शपथ.

**म्हातारा**-मुला, आतां तूंच माझा जीव वांचीव. कसें तरी ला या संकटांतून सोडीव, तुझे उपकार मी जन्मोजन्मीं विसरार नाहीं. माझीं मुलेंबाळें तुला दुवा देतील.

**येसाजी**-तुमची मला दया येते. पण काय करूं ? महाराजांचा ाणखी असा हुकूम आहे, कीं एखादा मणीपूरचा गृहस्थ कोणास आढळला आणि त्याला त्यानें कोतवालाच्या स्वाधीन केलें नाहीं; र त्यालाही देहांतशिक्षा करावयाची. प्रसंग मोठा बिनतोड खरा. ुमची दया करावी तर माझ्या प्राणावर बेतणार. धर्म करतां कर्म उभें रहावयाचें. बरें, तुम्हांला कोतवालींत नेऊन गुजरावें तर तुमची हत्या केल्याचें पाप शिरावर बसणार. कांहीं सुचत नाहीं.

**म्हातारा** – तर मग संपलेंच म्हणावयाचें माझें आयुष्य ! मुला, कसेंही कर, पण माझे प्राण वांचीव म्हणजे झालें. देव तुझें कल्याण करील !

**येसाजी**—बरें पण कायहो. तम्हांला आंबराई चौकीवर कोणीं हटकलें नाहीं ?

**म्हातारा**—तेथले शिपाई गुंतले होते तंबाखू ओढण्यांत. त्यांतून माझ्याजवळ कांहीं गांठोडें वगैरे नव्हतें. तें सारें मागें गड्याबरोवर आहे. माझ्याबरोबर त्याही बिचाऱ्याचें मरण ओढवलें पहा.

**येसाजी**-ठीक आहे, चावडीवरच्या शिपायांनीं तुम्हांला ओळखलें नाहीं हें एक बरें झालें. आतां तुम्ही चला माझ्या घरीं. माझे वडील कुंडिनपूरचे शंभुसिंग येथें दोन तीन दिवसांत यावयाचे आहेत. तेव्हां तेच तुम्हीं असा मी देतों गांवांत पुकारा करून. मात्र मी सांगेन त्याप्रमाणें तुम्हांला वागलें पाहिजे. कसें काय पतकरतें का हें ?

**म्हातारा**-पतकरतें म्हणून काय विचारतोस ? असेला लटका बाप होऊनच मी राहणार नाहीं. मी खरोखरीच्या बापाप्रमाणेंच तुझ्यावर प्रेम करीन. तूं मला जीवदान दिलें—आणखी तें काय पाहिजे ?

**तान्बा**-( एकीकडे ) यंवरे येसबा ! कसा घेरला म्हाताऱ्याला

अशी आपल्या मुठींत आणूनशान् ठेवलान् बगा. ह्यो म्हातारा का आतां माज थोरल धनीसाब व्हनार ! आन ह्यो एकादा कुटन्या-बिटन्या असला तर ! याच्या पायावर डोस्कं कसं ठेवावं. न्हाइ ह्यें व्हायचं आपल्यीच्यानं.

**यसाजी**-( एकीकडे तान्यास ) तान्या, वेशीबाहेर जाऊन या म्हाताऱ्याचा गडी येत असेल त्याला हें बग परस्पर कोठें तरी नेऊन अडकवून टाक. त्याची याची गांठ पडूं देतां उपयोगी नाहीं. ( म्हाताऱ्यास ) बाबा, चला.

**म्हातारा**-चल बाळ. [ जातात.

**तान्या**-आं चिभन बनल कीं बापलेक इक्क्यांतच ! काय मजा हाय बुवा. या यसाजीनं रस्त्यांतल्या रस्त्यांत बा पैदा केला न्हव का ! बाप लई मस्त झाल्यानी जनू. मीबी एकादा तालीवार बा बगतो घावला तर. म्हंजी मग चाकरी कराया नग. [ जातो.

## प्रवेश ४.-विजयपूर. प्रतापरावाच्या वाड्यांतील खोली.

**त्राटिका** आणि **पिलाजी** येतात.

**पिल्या**-बाईसाब, कसं करूं म्हंगता ! तुमांस्नी कायबी खायला देऊं व्हय ? माझ्याबी मनांत येतं बगा तसं. पन ह्यो धनी हायना खवीस: त्येला जर कळलं तर कोरड्याखालीं चामडं चाळड काडील कीं.

**त्राटिका**-देवा आतां करूं तरी काय ? रोज पहावें तर यांचा हा त्राम चढत्या कलावरच. यांनीं माझ्याशीं लग्न केलें तें का मला मारण्याकरितां कीं काय ? धन्यापासून तों थेट केरसुण्या चाकरापर्यंत सगळे मेले दगडाच्या अंतःकरणाचे आहेत. मी या घरची मालकीण नांवाला मात्र. माझा हुकूम एक ऐकेल तर शपथ. मला कधीं कोणापाशीं तोंड वेंगाडण्याचा प्रसंग आलेला नाहीं; येथें आला. पण उपयोग काय ? पोटभर अन्न मिळत नाहीं आणि घटकाभर स्वस्थ झोंप घेईन म्हटलें तर यांच्या या

आरड्याओरड्यामुळें डोळ्याला डोळा तरी कसचा लागणार? यांच्या शिव्या खाऊन भूक भागवावी आणि डोळे उघडे ठेऊन झोंप घ्यावी, असा प्रकार चालला आहे. इतकेंही करून वरती आव काय घालावयाचा, कीं हें सारें माझ्या प्रीतीसाठीं चाललें आहे. जसें कांहीं मीं पोटभर खाल्लें किंवा जराशी निजलें कीं मरेनच. याचाच तर मला विशेष संताप येतो. माझ्यानें आतां हा भुकेचा मारा बिलकुल सहन करवत नाहीं. या गड्यापाशीं गोष्ट काढून पाहतें. बघूं या वळला तर! बहुधा नाहींच वळावयाचा. पिलाजीबुवा, कसेंही करून कांहीं तरी खावयाला घेऊन या. हें पहा, कांहीं असलें तरी चालेल, खाण्यासारखें असलें म्हणजे झालें.

**पिल्या**-(एकीकडे) यंव, आतां कशी बया अक्षी नरम आलीया! पिलाजीबुवा म्हन! आणि पिलाजीराव म्हंगालीस म्हुन का माझ्याकडून तुला खायाला मिलनार? अग, त्यो हायना समंद थनं माझी चामडी लोळावनार. (उघड) माझ्या पोटांत बाइसाब तुमांकड बगून लई दया येतीया; आन या धन्याचा असा का राग येतुया की ह्येची चांगली खोडच मोडावी. पन बाईसाब, त्यो हाय लई कडवा. तरी पण न्हाइच, काय व्हईल त्यें व्हईल. मी तुमांसनी कायबी खायाला आणून येतोच. बरं मंग कसं? दोन अंडीं आणून देऊं का?

**वाटिका**-आणूं का म्हणून काय विचारतोस? त्यांचें नांव काढतांच माझ्या तोंडाला पाणी सुटलें. आण, आण लवकर.

**पिल्या**-पन बाईसाब, अंडीं लई गरम असत्यात म्हन. नगर बा. धनीसाबांच्या जर कानीं ग्येलं तर त्ये आमचं कानच उपटत्याल.

**वाटिका**-अरे गरम नाहीं आणि कांहीं नाहीं. तुला कोणीं तरी कांहीं भलतेंच सांगितलें. तूं जा आणि लवकर घेऊन ये दोन अंडीं; निदान एकका होईना.

**पिल्या**-छेः छेः छेः बाईसाब. त्येचं आतां नांवच घेऊं नगा.

पीच चुकलों तुमच्यापाशीं त्याचं नांव काडलं हतं. बर मंग तुमासनी नदींतला ताजा मासा कसा काय आवाडतो ?

**त्राटिका**-खरेंच, ताज्या माशाची गोडी कांहीं मजेदार असते. जा आतां बोलत बसूं नको. अगोदर घेऊन ये तो.

**पिल्या**-पन् मासा मंजी लई थंई न्हवका ! रातदिन पान्यांत ऱ्हानार. त्योबी न्हाइ उप्योगी तुमासनी देऊन. जर का हकडं तकडं झालं तर धन्याचीं खेटरं बसत्याल मला.

**त्राटिका**-पिलार्जीबुवा, कांहीं थंडी होत नाहीं. माझ्या अंगांत जाग्रणानें आणि उपासानें खूप कडकी भरली आहे, त्याला तर थंड उपचार चांगले. नका आतां उशीर करूं.

**पिल्या**-त्ये न्हाइ जुळायचं. आतां नदीकड जानार कोन् ! पन् ह्ये बगा, व्होवी तर थोडी सागुती आनून देईन. आन् लसनीच तिखाट.

**त्राटिका**-वा:, आणखीरे काय पाहिजे ? आण, आण पाहूं.

**पिल्या**-पन् ह्ये बगा त्यें तिखाट न्हाइ कामाचं. त्यें तर लई गरम.

**त्राटिका**-अरे तिखट नको, नुसतीच सागुती घेऊन ये.

**पिल्या**-अस कुठं झालंया ? तिखटाबिगर कसं गोड लागल ? आन् पचल तरी कसं ?

**त्राटिका**-बरं तर दोन्हीं आण; नाहीं तर एक आण; नाहीं तर दुसरें कांहीं तरी आण. उभा राहूं नको माझ्यासमोर आतां. माझ्यानें आतां धीर धरवत नाहीं. जा जा.

**पिल्या**-बाईसाब, काय तरी आन् म्हंगतां, तर मंग नुसतं तिखाट चालल का ? आन् धनीसाबांनीं मला बगितलं आन् मला इचारलं तर त्यांना काय सांगूजी ?

**त्राटिका**-चल, निघ येथून, मेल्या फसव्या, काळतोंड्या.

[ त्याला मारते. तो पळून जातो.

देवा, आतां कांहीं माझी धडगत दिसत नाहीं. सारे मेले शुद्ध पाषाण आहेत. त्यालाही एखाद वेळ पाझर फुटेल, पण यांच्या

मनांत कांहीं दया यावयाची नाहीं. कोण हा छळवाद ! खावयाला मिळालें नाहीं तर नाहीं, पण हा कोण कहर ? तोंडाला पाणी सुटावयाला लावावयाचें आणि मागून अशीं पानें पुसावयाचीं. मेले माझ्या मागच्या जन्मींचे वैरी दावा साधावयाला आले आहेत. मला छळतांना शिंच्यांना कसा आनंद होतो ! सारेच मेले कसे सारखे दुष्ट ! ही पहा आली स्वारी धन्यांची. आणखी मेला कांहीं तरी जाच आहे कपाळीं. हातांत ताट दिसतें आहे पण उपयोग काय ? त्यांतलें माझ्या नशिबीं कांहीं असेल तर कीं नाहीं !

**प्रतापराव** (हातीं पक्वान्नांनीं भरलेलें ताट घेतलेला) व **राणोजीराव** येतात.

**प्रताप०**-( त्राटिकेकडे पाहून आपल्याशीं ) बरीच नरम आली आहेशीं दिसते. भूक व जागरण या दोन महाप्रतापी मात्रा आहेत. कसलेंही भूत अंगांत संचरलें असलें तरी हटकून त्यास हुसकून लावतात. ( उघड ) राणोजी, काय ह्मणतोस ? तुझी त्या मूर्ख पोरीनं अगदीं टर उडविली. एकूण तुझ्या त्या अजब युक्तीचा कांहींच उपयोग झाला नाहीं. ( हंसत त्याच्याकडे पाहतो. )

**राणोजी०**-प्रतापा, त्याचें आतां नांव काढूं नको. तो सारा मूर्खपणा झाला. तो नाद मीं अजीबात सोडून दिला. अरे पण, तूं वहिनींसाठीं हे खाण्याचे पदार्थ आणले आहेस, हे तिला केव्हां देणार ? ती तेथें कसें वाईट तोंड करून बसली आहे पहा.

**प्रताप०**-अरे हो, मी तें विसरलोंच. ( तिच्याजवळ जाऊन ) राणोजीराव, ही पहा तुझी वहिनी. तिची प्रकृति थोडी बिघडली आहे. अरे किती नाजूक शरीर हें ! त्या दिवशीं प्रवासाची दगदग झाली ती तिला सोसली नाहीं. प्रिये, आतां तुला कसें वाटतें ? हातापायाची आग राहिली का ? डोकें नाहींना दुखत ? थोडीशी भूक वाटते का ? अरे, ही बोलत कां नाहीं ? अजून प्रकृति ताळ्यावर आली नाहींशी दिसते.

**राणोजी०**-वहिनी, काय होतें तुह्मांला ? अशा कष्टी कां ? आपल्या माहेरची मंडळी सारी खुशाल आहेत हो.

**त्राटिका**–मला काय धाड झाली आहे! हे माझी इतकी काळजी घेताहेत कीं मला निजूं देत नाहींत कीं खाऊं देत नाहींत. मग मला काय होणार? बाबांना भेटलां ह्मणजे सांगा कीं चांगला जिवंत समंध माझ्यामागें लावून दिलांत बरें. याच्या तावडींतून वांचलें तर नशीब ह्मणावयाचें.

**राणोजी०**–प्रतापराव, हें काय?

**प्रताप०**–शपथपुरःसर ही समंधाची गोष्ट आतांच मला कळली. लाडके, अग तूं संकोच कां धरतेस? मला अगोदरच कां नाहीं सांगितलेंस! ह्मणजे त्याला केव्हांच गाडून टाकलें असतें. (एकीकडे **राणोजीस**) तो समंध हिच्या अंगांत आहे म्हणून तर मला हा सारा त्रास पडतो आहे. (उघड) पिल्या, इकडे ये पाहूं असा पुढें. तुला ताकीद दिली होती ना येथें कोणाला सोडूं नको म्हणून? मग कसा समंध आंत शिरला? (**पिल्या** पुढें येतो. **प्रतापराव** त्याचा कान धरतो.)

**पिल्या**–आपुन दोघंच आतां आंत आल्ला न्हव का? आन तिसरा समंद कोन आंत आलाया?

**राणोजी०**–ह्मणजे कायरे? प्रतापराव आणि मी आंत आलों हेच का समंध?

**पिल्या**–मी काय सांगूजी?

**प्रताप०**–आं, मी समंध काय? फार फाजील बोलूं लागलास! घे हें बक्षीस. (त्याच्या पाठींत दोन चार बुक्के मारतो.)

**त्राटिका**–जाऊं द्या. उगीच कांहीं निमित्त काढून त्याला कां मारतां? अगोदर त्या ताटाचें कांहीं नाहीं का करावयाचें?

**प्रताप०**–घरांतून राणीसाहेबांचा हुकूम झाला. आतां कोण मारतो! जा, लेका, बाईसाहेबांचे उपकार मान. पड त्यांच्या पायां. (**पिल्या त्राटिकेच्या** पायां पडतो.) अस्सें. प्रिये, या ताटाकडे तुझी नजर गेली का? हें ताट माझ्या प्रीतीनें भरलें आहे. तूं येथें आल्यापासून तुला सुग्रास अन्न खावयाला मिळालें नाहीं, तेव्हां आज समक्ष उभा राहून हीं पक्वान्नें तयार करविलीं. पहा तर खरी या जिलिबीची गोडी!

( जिलिबीचा एक बारीक तुकडा तिच्या हातीं देतो तीं तो फेंकून देते.) हं; समंध जरा जबरदस्त आहे. अजून निघत नाहीं ह्मणतो. ठीक आहे. पिल्या, चल घे हें ताट आणि ठेव नेऊन मुदपाकखान्यांत. ( ताट फेंकून देतो. )

**राणोजी०**-अरे राहूं दे दें. वहिनीला फार भूक लागली आहे. तिला खाऊं दे थोडेंसें.

**प्रताप०**-तुला नाहीं त्यांतलें कांहीं समजत. भूक लागला असली ह्मणून काय झालें! एखाद्या चाकरमाणसानें आपलें काम वेळीं केलें तरी आपण त्याला शाबासकी देतों. येथें तर मीं स्वतः हीं पक्वान्नें केलीं, त्याबद्दल उपकार मानावयाचे राहिले एकीकडे, उलटा त्यांचा असा अव्हेर! मला नाहीं असला हा अपमान खपावयाचा. नुसता एक गोड शब्द तरी हिनें बोलावयाचा होता. बरें आहे, माझें तरी काय अडलें आहे? ती मघाशीं ह्मणाली तेंच खरें. हे सारे त्या समंधाचे खेळ आहेत. पिल्या, नेतोस कीं नाहीं हें ताट?

**पिल्या**-जी धनीसाब, हें उचललें बगा. ( ताटांत जिन्नस भरून उचलतो.) मी पन भला गावलोया चाकूर आमच्या धनीसावांस्नी. ये हकड, घ्ये दोन रट्टे. जा तकड, घ्ये दोन ठोसे. ह्ये कर न्हाइतर घ्ये दोन लाता. असंच का क्येलंस घ्ये दोन कोरड्याचे तडाके. ह्या खाऊ खाऊनशान मी पन अक्षी मोटवानी फुगनार बगा.

**त्राटिका**-असूं दे तें ताट. त्याच्यावर कां रागावतां? मींच त्याला खुणेनें ताट नेऊं नको असें सांगितलें. खरेंच पण स्वतः कशाला इतकी तसदी घ्यावयाची ती? मुदपाकखान्यांत नव्हतें का कोणी ताट आणावयाला? नाहीं तर मला सांगावयाचें होतें. मी नसतें का तिकडे गेलें?

**प्रताप०**-आतां ठीक बोललीस. पण हें पहा मी असतां तुला कसे इतके श्रम पडूं देऊं? अग तूं श्रीमंताच्या घरची. तुला चालावयाचे श्रम मी कसा देईन बरें? त्यांतून तुझी प्रकृति नादुरुस्त. तुला भूक लागली आहे हें जाणूनच मीं इतकी जलदी केली. पण हे तुझे भाऊजी आज लांबून आले आहेत. त्यांना अगोदर खाऊं

दे. मग ताट आहे आणि तूं आहेस. तूं राणोजीरावापुढें लाजूं नकोस, तो केवळ माझा सख्खाच भाऊ आहे असें समज. तूं हीं पक्वान्नें खाल्लीस ह्मणजे मी स्वतःला मोठा धन्य मानीन. ( **राणोजीस** एकीकडे ) राणोजी, झपाझप त्यांतलें बहुतेक खाऊन टाक. तिच्याकरतां अगदीं थोडें शिल्लक ठेव. ( उघड ) प्रिये, तूं खाल्लेंस ह्मणजे आज आपण कुसुमपुराला जाऊं. आतां माझें कांहीं काम शिल्लक राहिलें नाहीं. लग्नाची मेजवानी राहिली आहे ती आपण मामासाहेबांना पचूं देणार नाहीं. आतां इतक्यांत शिंपी, कापडवाला, सोनार, मोतीवाला हे येतील. तुझ्याकरतां आज उमदें कापडचोपड, मौल्यवान दागदागिने खरेदी करावयाचे. (**राणोजी** पुष्कळसे पदार्थ खाऊन ताट **त्राटिके**पुढें करतो. ) शालू, पैठण्या, भरजरीच्या झगझगीत तुला आवडतील त्या घे. हिऱ्यामोत्यांचे दागिने, तन्मणी, पेट्या, बुगड्या-जशा कांहीं मोत्यांच्या नक्षत्रमाळाच लोंबताहेत;-अग तुला आज अशी सजवतों, कीं पाहणाराचे डोळे दिपून जावे. या प्रतापरावाला कांहीं कमी नाहीं. अरे वाः, तुझें खाणें इतक्यांत आटपलें ? शाबास. त्वरा असावी तर अशी ! पिल्या, उचल तें ताट. आणि बाहेर शिंपी वगैरे आले आहेत त्यांना आंत लावूनदे. ( **पिल्या** तिच्यापुढचें ताट घेऊन जातो.) कसें काय गळेकापू ? या असे.

**शिंपी** येतो.

आणि अगोदर ती काचोळी काढा.

**कापडवाला** येतो.

वाः आपलीही स्वारी आली का ? घालणार आह्मांला आज आपण मोठा गंडा.

**मोतीवाला** येतो.

यी. आज आमचें घर आपण धुवून नेणार. आमच्या येथ या गांवांतील साऱ्या अट्टल लुटारूंची एक प्रचंड सभाच आहे. एक कमी आहेत. वाः हे पहा आलेच. अगदीं शंभर वर्षे आयुष्य आहे चोराला.

**सोनार येतो.**

साऱ्या चोरांचे राजे आले. आतां दरबार भरलें खरें! (कापवाल्यास) हुं, काढा आपापला माल. हें पहा, तुमच्यापाशीं अंगीं अस्सल उत्तमापैकीं माल असेल तो काढा. चांगला माल नसेल तर नामनें नका सोडूं. मुकाट्यानें घरीं जा. येथें भिकारडा माल खपावयाचा नाहीं. या रत्नाला (चटिकेच्या हनुवटीला हात लावून) आजे असाच माल पाहिजे. हं गळेकापू, अजून नाहीं निघाली आपली काचोळी.

**शिंपी**–ही पहा रावसाहेब, तयार आहे. पहा तर खरें हिचें काम. मुद्दाम पांचशें चांगल्या चांगल्या किनखापांतून हे तुकडे वेचून काढले आहेत. असा कपडा पहावयाला मिळावयाचा नाहीं. तुकडे जोडतांना तर्‍ही किती शिताफी दाखविली आहे. रंगाचा मेळ तर पहा, नजर ठरत नाहीं. हे निळे, तांबडे, पिवळे, हिरवे तुकडे किती मजेनें जोडले आहेत. जसें इंद्रधनुष्य! बाईसाहेबांना ही अंगांत तर घालूं द्या. त्यांना असें होईल, कीं ती अंगांतून काढूंच नये. आपल्यालाही होईल कीं कामधाम सोडून नुसतें बाईसाहेबांकडे पाहत रहावें. ही चोळी त्या फटाकड्या चंपाजीच्या नजरेस पडली, तेव्हां त्यांनीं ती आपल्याला मिळावी ह्मणून किती गळ घातली ह्मणतां? वाः लांबून तर नुसतें मिन्याचें काम दिसतें आहे.

**प्रताप०**–ही काचोळी त्या रांडेनें हातांत घेतली होती का?

**शिंपी**–रावसाहेब, नुसती हातांत काय त्यांनीं अंगांत देखील घालून पाहिली आणि मग कांहीं केल्या काढीनात. त्यांना जेव्हां कोतवालाची भीति घातली तेव्हां त्यांनीं ती परत दिली.

**प्रताप०**–अस्सें काय? तर मग तुलाचं अगोदर कोतवालाकडे पाठवितों. रांडेच्या अंगांतली चोळी माझ्या प्रियेला घालावयाला लावणार तूं? हरामखोरा, पाजी, गधड्या, चोरा!

**शिंपी**–रावसाहेब, शिव्या नका देऊं. चोळीवर एकदा नजर तरी टाका.

**प्रताप०**–(चोळी घेऊन) हिचंच का इतकें स्तोत्र चालविलें होतेंस तूं! ही का काचोळी आहे? आणि ही इतकी घट्ट कां केलीस?

हलक्या बायकोप्रमाणें माझी आनंदी दिसावी म्हणून होय ? अरे महारा ! पिल्या, आण तो चाबूक इकडे.

**पिल्या**–हा घ्या धनीसाहेब. आन् मींही ओढूं का दोन कोरड ( चाबूक पुढें करतो. )

**शिंपी**–रावसाहेब, काचोळीचा काय तो निकाल करा. मला वेळ नाहीं येथें बसावयाला.

**प्रताप०**–काचोळीचा निकाल करूं होय ? ठीक आहे. आतांच्या आतां करतों बरें. ही काचोळी जा त्या तुझ्या काकीला चंपाजीला नेऊन दे. माझी बायको बाजारबसवी नाहीं, समजलास. निम्मी छाती उघडी टाकून पाठ मोकळी दाखवून लोकांचीं मनें तिला भुलवावयाचीं नाहींत. ही का काचोळी आहे का ठिगळांची गोधडी आहे ? असली तुकड्यांची चोळी घालावयाला ती का भिकाऱ्याची बायको आहे ?

**त्राटिका**–असें काय भलभलतें बोलावयाचें तें ? काय झालें त्या काचोळीला ? ती अशी तुकड्यांचीच करतात हो. आपल्याला अक्कल नाहीं तर दुसऱ्यापासून तरी शिकावी. संभावीत बायका देखील काचोळ्या घालतात. माझ्या मनांत ती उतरली.

**शिंपी**–बाईसाहेबांनीं खरी पारख केली.

**प्रताप०**–अरे हजामा, ती काय ह्मणाली तें तुला कळलें तरी ? ती ह्मणते ही हिच्या मनांतून उतरली. तुला जर शिवण्याची अक्कल नव्हती तर दुसऱ्यापासून शिकावयाची तरी होतीस. हूं उचलतोस का नाहीं ही चोळी का उडवूं कोरडे ?

**शिंपी**–रावसाहेब, मी चोळी परत न्यावयाचा नाहीं. आपल्या गड्यानें सांगितल्याप्रमाणें अगदीं बरोबर ही तयार केली आहे.

**पिल्या**–कायर खिसकातरीच्या, काय ह्मनतुयास तूं ?

**शिंपी**–तूं नाहीं मला सांगितलेंस अशी अशी शीव ह्मणून ?

**पिल्या**–आं धनीसाब, बगितलं का कसा गळपडू हाय तो. माझा ह्या का शिपी व्हता व्हय म्हून मी याला चोळी अशी अशी शीव असं सांगन ? कायरं सुईदोरीच्या, खरं बोल न्हाइ तर धनीसाबांच्या समूर तुझं कसाब काढीन बगं सारं भाइर.

**शिंपी**—रावसाहेब, साफ खोटं बोलतो आहे हा. ( खिशांतून कागद काढून ) हें पहा यानेंच दिलेल्या मापाचें टिपण मीं केलें आहे. ( वाचीत ) गळा किती कापणें, छातीची किती रुंदी धरणें, घडावरचा घेर किती, हीं पहा मापें घातलीं आहेत. मी खोटं बोलत असेन तर नामदेवाची आणि या माळेची शपथ.

**पिल्या**—धनीसाव, अक्षी खोट. मी मापं कशीं देईन जी ? मला काय ठावं मापबीप ? मी फकत इक्कं बोललो, कीं बाईसाबांसाठीं एक लई छान चोळी शिवून दे. गळा काप, यं कर, त्यं नग करूं, ह्ये मी कशापायीं बोलूं ? देवाच्यान् आपल्याच पायाची शपथ.

**शिंपी**—अरे चोरा, इतका खोटें बोलणारा तूं असशील असें मला वाटलें नव्हतें, नाहीं तर मी दोनचार साक्षी ठेवून तुझे दांत चांगले पाडले असते.

**पिल्या**—तुझा बाप खोट बोलणारा ! आन् दात कोनाच पाडणारर ? माझ व्हय ? दाऊं का तुला माझ्या दातांचा जोर ! गाढिच्या, लईजणांच गळ कापल असशील, लईजणांच खिस कातरलं असशील, आन् लईजणांस्नीं टोप्याबी घातल्या असशील, पन ह्ये बग ह्यो मरद त्यांतला न्हव बरंका ! शिवीबिवी न्हाइ ऐकून घ्यायचा. गुमान् आल्या वाटनं जा, न्हाइ तर धनीसाबांचा हुकूम व्हताच रद्ध्याला धरून दोन चार ठोस चढवीन आन् देईन भाइर घालवून.

**शिंपी**—का, तोंड फारसें सोडलें आहेस ? येशील शिंपीआळीला पुनः ?

**पिल्या**—का बर ? काय करशील तूं ? बरं हाय. होऊं द्या तुमच आमच दोन हात. मरद नसशील तर आतां माझ्याशीं लढल्याबिगर राहशील. घ्ये तर तुझा गज हातांत आन् हो म्होर.

**राणोजी**—त्याच्या हातांत गज आणि तुझ्या हातांत सोडगा घेणार वाटतें ? वाः खाशी जोड !

**पिल्या**—तस कशापायीं ? व्होवं तर तो आपल्या हातांत कातरी आन् अंगुस्तानबी घेईना ? मी कुठं नग म्हनतो ?

**प्रताप०**—बस्स, पिल्या चूप रहा. अहो, कातरी—गज—अंगुस्तान—

बहाद्दूर.- आह्मांला तुमच्या काचोळीची गरज नाहीं. समजलां ! ही का काचोळी आहे, का नाकाडोळ्याच्या वैदूचा झोळणा, का गिलच्याचा चोळणा, का गारोड्याची पोतडी, का डोंबाऱ्याची पिशवी, का गोसाव्याची झोळी, का वाण्याचें पोतें ? याला ह्मणावें तरी काय ? जा ती त्या आपल्या ताराजी नाहीं तर चंद्राजी नाहीं तर चंपाजी यांना नेऊन द्या. आमच्या येथें असा माल खपावयाचा नाहीं. कां आनंदी असेंचना ? कांहीं हरकत नाहीं. तूं बोलावयाची तसदी घेऊं नको. तुझ्या मनांतलि भाव मी समजलों. शिंपीबोवा, उचला आतां आपलें चंबूगबाळें ! नाहीं तर संभाळा. ( चाबूक वाजवितो. )

त्राटिका-माझ्या मनांतील भाव आपल्याला कळला का ! ठीक झालें कळला तर मग. आतां आपण मध्यें तोंड घालूं नका. माणसाला मेला बोलावयाचा कंटाळा कसा येत नाहीं कोण जाणें. आमचे कान देखील दुखूं लागले ऐकतां ऐकतां, पण यांचें तोंड कांहीं रहात नाहीं वाजावयाचें, हें पहा. मी कांहीं कोकुलें बाळ नाहीं, बोळ्यानें दूध पीत नाहीं, चाललेले सारे प्रकार माझ्या लक्षांत येऊन चुकले. मी आपल्याला साफ सांगतें आपण कांहीं करा, मी कांहीं आपलें कुत्रें होऊन राहणार नाहीं. मला वाटेल तसें मी करणार. आपल्याला हवे तितके आपण माझे हाल करा. शिंपीबोवा, ठेवा ती काचोळी. मला ती फार आवडते. आपल्या मेहनतीचे पैसे मी चुकते करून देईन बरें !

राणोजी०-( आपल्याशीं ) आला पुनः खटक्याचा प्रसंग ! ही चकमक मोठी मजेची आहे. पहावें कोण जिंकतें तें.

शिंपी-बाईसाहेब, ही घ्या चोळी ! आपल्याकडून पैसे येण्याबद्दल मला कांहीं काळजी नाहीं. रावसाहेबच मुकाट्यानें पैसे काढून देतील. ( चोळी पुढें करतो. )

प्रताप०-( शिंप्याच्या हातची चोळी हिसकावून घेऊन ) कायरे गधड्या, महारा, हरामखोरा, धेडा, बेरडा, हजामा ! तुला लाज वाटत नाहीं एकदम माझ्या बायकोशीं बोलावयाला ! पहा ती कशी संतापानें लाल झाली आहे ती. चल निघ. तिच्या डोळ्यासमोर उभा राहूं नको. अजून गेला नाहींस ? आणखी पुनः तिच्या

तोंडाकडे पाहतोस ? थांब तुझे डोळे फोडतों. पिल्या, गद्ध्या, बघतोस काय ? दे चार लाथा आणि काढ बाहेर.

[ **पिल्या** शिप्याला लाथा मारीत बाहेर घेऊन जातो.

( **राणोजीरावास** एकीकडे ) राणोजी, त्याच्यापासून ती चोळी घेऊन पिल्याजवळ दे आणि पैसे लवकर चुकते होतील ह्मणून सांग. त्याची नीट समजूत कर. [ **राणोजीराव** जातो.

( कापडवाल्यास ) हं, काढा पाहूं तो शालू. प्रिये, कसं काय, तुला हा आवडतो का ! नाहीं ना ? ठीक आहे. अग नको घालूं कपाळाला इतक्या आंठ्या. हं, अगोदर झांकून टाका तो, तुमच्याजवळ अस्मानी बुट्टीदार चांदणी शालू असला तर आणा. ह्मणजे तो नेसला असतां माझी प्रिया आकाशांतल्या चंद्राप्रमाणें खुलून दिसेल.

**कापडवाला**–रावसाहेब, पण या शालूची खुमारी तर पहा. याचा नोकझोंक तर लक्षांत घ्या. याची चमक तर न्याहाळा. असला शालू मिळावयाचा नाहीं. तो बाईसाहेबांच्या मनांत फार भरला आहे.



**प्रताप**०–अरे चोरा, तुला एकदां सांगितलेंना। तिला तो नको ह्मणून. तिनें नाक मुरडलेलें तूं नाहीं पाहिलेंस ? आणखी तिच्या तोंडाकडे पहावयाला तुला सांगितलें कोणीं ? तुझी योग्यता काय ? छिनाल, बदफैली, कैफी, अफूबाज, गांजाकस नाहीं तर. जातोस का नाहीं ? पिल्या !

**कापडवाला**–रावसाहेब, कशाला इतकी तसदी ? हा मी निघालों पहा सरकार, चाललों सरकार, येतों सरकार, माफ करा सरकार. बाईसाहेब, येतों. [ जातो.

**प्रताप**०–प्रिये, आज कांहीं खरेदी करावयाची नाहीं. अहो ! चोर, भामटे, कसाई, गळेकापू, हलकटांनों ! चला चालते व्हा. आज सौदा जमावयाचें चिन्ह नाहीं. आज मुहूर्त वाईट लागला होता ह्मणून या चोर, लुच्चे, पाजी, दगलबाज, छिनाल, कैफी,

बद्फैली, अट्टल सोद्यांची गांठ पडली. हं, उठा, आटपा, बोजा उठवा, काळें करा.

[ सोनार व मोतीवाला जातात.

ओ मेरे दिल, ओ जान आनंदी, आ मेरा कलिजा! चलो, आप ऐसेही चले जाएंगे. आपल्याला हे डागदागिने, हा कपडालत्ता घेऊन काय करावयाचें आहे? हा सारा बाहेरचा भपका. हा दाखवून आंतला काळेपणा थोडाच लपवावयाचा आहे आपल्याला! आपल्या मनाचा मोठेपणा आणि आपल्या तिजोरींतील संपत्ति हीं तर कांहीं नाहींतशीं होत नाहींत ना? चंद्राचें बिंब ढगाच्या आड असलें म्हणजे त्याची शोभा विशेष, तसे सद्गुणही गरिबीच्या थाटांतच अधिक योग्यता पावतात. सापाची कातडी गुळगुळीत असते म्हणून त्याला कोणी कवटाळून धरील? काय सांगूं तुला प्रिये, या भिकार व मळकट वस्त्रांनींच तूं मला अत्यंत मोहक दिसते आहेस. अशीच तूं मला अधिक प्रियकर वाटतेस. अग, तुझीं वस्त्रें अशीं आहेत याबद्दल तुला लाज वाटूं देऊं नकोस. याची लाज मला. तूं आनंदांत रहा. चला आतां मामांकडे जावयाला निघूं. तेथें गेल्यावर आपण शिल्लक राहिलेली मौज मारून घेऊं. आनंदी आनंद करूं.

**राणोजीराव व पिल्या** परत येतात.

पिल्या, जा घोड्यावर सामान टाक आणि तीन वाटेच्या कोपऱ्यावर घोडीं घेऊन उभा रहा. [ **पिल्या** जातो.

प्रिये आपण तेथपर्यंत चालत जाऊं. या राईतून आपण दोघे मोठ्या आनंदानें सहल करीत जाऊं. राणोजी, तूंही चल आमच्याबरोबर. अहाहा! किती शांत व आल्हादकारक ही सकाळची वेळ आहे. मला वाटतें आपण दुपारच्या जेवणाला तेथें सहज जाऊन पोचूं.

**त्राटिका**–आतां कोठें उजाडलें आहे! काय तरी पण कोवळें ऊन हें! आपल्याला असेल हें सोसत, पण मी साफ सांगतें मला नाहीं अशा कडक उन्हांत चालवत. भलतेंच आपलें कांहीं तरी बोलावयाचें झालें. नुकतेच नाहीं का दोहोंचे ठोके पडले!

**प्रताप०**-दोहोंचे ठोके पडले ? इतकी का पहाट आहे अजून ? मग आपल्याला पोंचावयाला दुपार तरी कशाला पाहिजे? झांझुरकें उजाडतांच जाऊन पोचूं.

**त्राटिका**-पुरें पुरें. कोणीं ऐकलें तर काय ह्मणेल ? आपलें वेडेपण झांकण्याची ज्याला अक्कल नाहीं त्याला बाई काय ह्मणावें ?

**प्रताप०**-असें काय ? आह्मांला अक्कल नाहीं का ? हा आमचा मान ! बायकोनें मात्र जगापुढें नवऱ्याचे पाहिजे तसे धिंडवडे काढावे, तिला तसें करण्याचा पूर्ण अधिकार ! तें कांहीं का असेना. मी पुनः असें ह्मणतों कीं यावेळीं पहाट आहे.

**त्राटिका**-मीही पुनः ह्मणतें कीं आतां दोनप्रहर टळून तिसऱ्या प्रहराचा अंमल आहे.

**प्रताप०**-बरें आहे तर मग. आतां पहाट आहे हें कबूल झाल्याशिवाय पुढें जावयाचेंच नाहीं. एक पाऊलभरही हलावयाचें नाहीं. मी ह्मणेन ती वेळ झाल्याशिवाय आपल्याला साफ निघावयाचें नाहीं. पिल्या, उतर घोड्यावरचें सामान. आपली जाण्याची तब्बेत लागत नाहीं. बाईसाहेब, हें ऊन फारच कडक आहे बरें. अशा उन्हांत आपली नाजूक काया करपेल. आपण आपलें हें गुलाबाचें फूल घरांत नेऊन नीट जपून ठेवा.

**राणोजी०**-( आपल्याशीं ) हा सूर्याला देखील आपला बंदा गुलाम करील, मग हिची काय कथा? हा हिला तेव्हांच वठणीला आणणार. जावयाचें नाहीं ह्मणतांच पहा कसें तोंड खरकन उतरलें तें ! पण अजून ताठा कोण आहे ! ही इतक्यांत नाहीं कबूल व्हावयाची; पण हा खरोखरीच जात नाहीं असें पाहिलें ह्मणजे आपोआप नरम येईल.

**त्राटिका**-देवा, कसें मला या आगींत आणून घातलेंस ? माझें लग्न झालें नसतें तरी बरें होतें. मी बाबांच्या घरीं बटीक होऊन देखील खुषीनें राहिलें असतें. हा जाच माझ्याच्यानें आतां नाहीं सोसवत. मुकाट्यानें हे म्हणतील तेंच कबूल केलें पाहिजे. पण तसें तरी कसें करावें बाई ? भलतेंच कसें खरें ह्मणावें ? ह्मणूं नये

तर हा जाच सोसला पाहिजे. छेः पण आपल्याच्यानें हा आतां नाहीं सहन होत. जाते.

**राणोजी०**–प्रतापराव, किती छळतोस तिला? तिचें तोंड पहा कसें तरलें आहे तें! खरोखरींच मला तिची दया येते. ती आतांना काय ह्मणाली तें ऐकलेंसना?

**प्रताप०**–अरे, ऐकलें इतकेंच नाहीं, पण ऐकून मनाला थोडासा संतोषही वाटला. माझें काम पाऊण हिस्सा झालें. तिला मी असें वागवितों याचें मला वाईट वाटत नाहीं कीं काय? पण यावेळीं तिच्यावर दया करणें ह्मणजे तिचा व आपला घात करून घेणें होय. निष्ठुरता हीच यावेळीं खरी दया आहे. तिच्या अंगची दुष्ट खोड गेल्यानंतर मग पहा मी तिचे कसे लाड करीन ते.

**राणोजी०**–आतां माझें येथें राहण्याचें कारण नाहीं. बायकोला कशी वठणीला आणावी हें आपण शिकलों. एक चाबूक, रागाचे हावभाव, आणि आरडणें ओरडणें कीं आलें प्रकरण ताळ्यावर. प्रतापराव, मी कां आलों होतों हें तुला सांगितलेंच आहे. आतां जाऊन सारजेशीं लग्न लावणार. पहिल्या लग्नाची मिळत नाहीं तर पाटाची का होईना. ताजी भाकर मिळत नाहीं तर शिळीवरच भूक भागविली पाहिजे. प्रकरण जरा जड आहे; पण तुझ्यापासून तिला नरम आणण्याची गुरुकिल्ली आतां शिकलोंच आहें. पहातों आतां ती काय थेर करते ती. दे आतां मला तुझा आशीर्वाद आणि तो तुझा यशस्वी चाबूक.

**प्रताप०**–माझा तुला आशीर्वाद आहे. हा घे चाबूक. पण संभाळ हो..नाहीं तर तुझ्याच अंगावर उलटेल. एक युक्ति सगळ्यांना साधते किंवा सगळ्या ठिकाणीं चालते असें नाहीं. ये आतां.

[ जातात.

## प्रवेश ५.-कुसुमपूर.-धनाजीरावाच्या वाड्यासमोर.

**येसाजी** आणि **शंभूसिंगाचा** वेष घेतलेला **म्हातारा** येतात.

**येसाजी**-बाबासाहेब, हेंच धनाजीरावाचें घर. आंत जावयाचें ना ?

**म्हातारा**-अलबत, धनाजी व आह्मीं सुमारें तीस चाळीस वर्षांमागें गहटोरच्या छावणींत दोन महिने एके ठिकाणीं होतों असें त्यांना सांगतों.

**येसाजी**-ठीक आहे. छावणींत पुष्कळांची गांठ पडते. त्यांपैकीं सगळेच चेहेरे ध्यानांत राहतात असें नाहीं.

**तान्या** येतो.

कायरे तान्या, सांगितलेलें सारें ध्यानांत आहेना ?

**तान्या**-हाय तर जातं कुटं ? ( **म्हाताऱ्यास** ) धनीसाब, आपण करूनशान् हकड आला-म्हुन बरं झालं. न्हाइतर आमच धाकट धनीसाब काय न बाईच करत. त्येंन्ला या मुलीचं अक्षी येड लागलं हाय बगा.

**येसाजी**-तान्या, बस्स, लघळपणा करूं नकोस. धनाजीरावांना माझा निरोप कळविलास का ?

**तान्या**-मी का गाडाव हाय व्हय ? कवाच जाऊन सांगूनशान आलों की; आन् ह्ये बगा धनाजीरावच येत्याती झोर.

**धनाजीराव** व **रंभाजीराव** ( पुराणीक ) येतात.

**धनाजी**०-रंभाजीराव, आपले वडील, वाटतें ? रामराम, शंभूसिंगजी, आंत चला. आपण आल्यानें माझें घर अलंकृत झालें.

**म्हातारा**-ठीक आहे. चला आंत. ( सर्व आंत जाऊन बैठकीवर बसतात. )

**येसाजी**-बाबासाहेब, हेच ते गृहस्थ, ज्यांच्या मुलीनें माझें मन चोरलें आहे. मला सुखी करून आपलें माझ्यावरील प्रेम दाखविण्याची हीच वेळ आहे.

**झातारा**-बाळासाहेब, जरा दमादमानें, धीरें धीरें घे. आम्ही अनुभविक म्हातारीं माणसें. उतावीळपणा आह्मांला बिलकुल खपत नाहीं. धनाजीराव,-धनाजीरावचना आपलें नांव? राहटोरच्या छावणींत आपण एके ठिकाणीं होतों. त्याची आहे का आपल्याला आठवण? कोठून असणार? झालीं त्या गोष्टीला तीस चाळीस वर्षे. मला तुह्मीं अगदीं जुन्या स्नेह्याप्रमाणेंच वाटतां. तेव्हां मोकळ्या मनानें बोलावयाला कांहीं हरकत नाहीं. मुलाकडून मला सगळी हकीकत कळली आहे. मला घासाघीस करीत बसण्याची संवय नाहीं. माझ्या मुलाच्या मनांतून आपल्या मुलीशीं लग्न लावावयाचें आहे. त्यानें मागणी देखील केली आहे असें ऐकिलें. वास्तविकपणें त्यानें आमचा सल्ला न घेतां हें केलें हें गैरव. तथापि आमच्यासारख्यांचें शहाणपण तरुणांत कोठून येणार? ते उद्धट, अविचारी आणि उच्छृंखल असावयाचेच. पण इतकें बरें आहे, कीं या ठिकाणीं त्याला फारसा दोष देतां येत नाहीं. आपला नांवलौकिक मोठा आहे. आपण कुलीन व श्रीमंत आहां. आपली कन्याही रूपानें चांगली आहे. मग कसें काय?

**यसाजी**-( आपल्याशीं ) झातार्‍यानें चार शिव्या तर देऊन घेतल्या!

**धनाजी०**-हें पहा, मलाही पाल्हाळ लावतां येत नाहीं. आपले चिरंजीव रंभाजीराव माझ्या मुलीला नापसंत नाहींत. त्यांनाही ती आवडली आहे. दोघांचे दिल एक झाल्यावर आपण बुदरुकांनीं त्यांच्या आड येणें बाजवी नाहीं. हुंडापांडा, मानपान यांविषयीं आपलें ह्मणणें कळलें ह्मणजे झालें.

**झातारा**-ठीक आहे, मला कोठें पांचपंचवीस पोरें आहेत. हा रंभाजीरावच कायतो एकटा माझ्या मालमत्तेचा एकुलता एक वारस. तेव्हां लग्नसमारंभ मोठ्या थाटाचा व कडाक्याचा झाला पाहिजे. शुभं च शीघ्रं. चला, आतांच्या आतां कोठें तरी चारचौघांसमक्ष सुपारी होऊं द्या.

**धनाजी०**-माझ्या येथेंच हा समारंभ व्हावा, हें ठीक. पण तो रणधीरराव सारखा माझ्यामागें लागला आहे. त्याचा माझा स्नेह

फार दिवसांचा. ह्मणून निश्चित झाल्याशिवाय त्याला ही गोष्ट माझ्या मनांतून कळूं द्यावयाची नाहीं. आपण हें बोलणें बोलत असतां त्याचा खोकला मध्येंच यावयाचा.

**ह्मातारा**–बरें तर असें कराना? आमच्या घरीं चला. तेथें दोघांचौघां गृहस्थांना बोलावून आणूं. तेथें जवळच मुरलीधराचें देऊळ आहे त्या ठिकाणीं जाऊन उपाध्येबुवांना बोलावून आणून सुपारी करून टाकतां येईल आणि आज आह्मांला आपला पंक्तिलाभ दिलाच पाहिजे. नाहीं ह्मणूं नका.

**धनाजी**०–तुमचा आग्रहच आहे तेव्हां नाहीं म्हणत नाहीं. पुराणीकबुवा, मावशींना जाऊन ही हकीकत कळवा. त्यांना ह्मणावें रंभाजीरावाशीं कमळाबाईचें लग्न व्हावयाचें ठरलें. आतांच सुपारी होणार आहे ह्मणावें. आणि तसेंच सांगा मी रात्रीं जेवावयाला यावयाचा नाहीं.

**रंभाजी**०–वाः ही गोष्ट मी त्यांना मोठ्या आनंदानें कळवीन! कमळाबाईचें रंभाजीरावाशीं लग्न होणार याहून आनंदकारक गोष्ट दुसरी ती कोणती असणार?

**येसाजी**–चलतांना मग आमच्या घरीं? ( **धनाजीराव व ह्मातारा** पुढें चालूं लागतात. ) ( **रंभाजीरावास** ) राव, आतां शिकार तुमच्या हातीं आहे. वडिलांची परवानगीही तुमच्या समक्षच मिळाली. आतां रंभाजीरावाचें कमळाबाईशीं लग्न लागावयाला कोणती हरकत? मात्र वेळ गमावूं नका. पुनः संधि यावयाची नाहीं. तान्या सांगेल तसें करा. [ जातो.

**रंभाजी**०–हृदया, या वेळीं धैर्य धर. आजपर्यंत केलेल्या तपश्चर्येचें फल मिळण्याची पुण्यसंधि आली आहे. असें घाबरल्यासारखें धडधड उडूं नकोस.

**तान्या**–अवू पुरानीकबावा, वाइच हकड या.

**रंभाजी**०–काय उर्मट पोरटा आहे पहा. अरे ए गद्ध्या, तूं इकडे यावयाचें सोडून मला तिकडे बोलावतोस? (त्याचा कान धरतो. )

**तान्या**–हां हां, धनीसाब, संभाळा. मला आतां वळक पट-

लीया. त्या सोद्या येसाजीनं ज्यांचं स्वांग घ्येतलं हाय त्ये रंभाजीराव माझ धनी न्हवत का आपुन?

रंभाजी०-अरे चूप. मोठ्यानें नको बोलूं असें! अगोदर येसाजीनें काय सांगितलें आहे तें सांग.

तान्या-ह्यें बगा धनीसाब. त्या ह्यौताऱ्यानं आन् येसाजीनं धनाजीरावांस्नी तकड का न्येलं त्यें कळलं का तुमास्नी! ह्येरा बगूं त्येतलं इंगित! नसलं ह्येरत तर हरलों ह्मना आन् व्हा मोकळं. ह्यो पठ्या तुमास्नी त्ये संमदं उलगाडून सांगील न्हवं का?

रंभाजी०-आपल्याला नाहीं हेरत. तूंच सांग त्यांतलें इंगित.

तान्या-कसं ह्मगतां? तुमास्नी न्हाइ ह्येरत? इक्कं सोपं तुमास्नी सादना मंग ती फटाकडी तरी तुमास्नी कशी गवसल जी?

रंभाजी०-बरें बरें, हा चहाटळपणा पुरे. अगोदर बोल काय तें.

तान्या-आं धनीसाब, रागावला व्हय! तर मंग माफ करा जी. आतां म्हुन ह्यो गडी येक सबुद बी बोलायचा न्हाइ. ह्यें बगा मारलं टाळं. (तोंड दाबून धरतो.)

रंभाजी०-(तोंडाचा हात काढून) रंभाजींचा निरोप सांगतोस कीं नाहीं? नाहींतर पहा आपला विचार.

तान्या-सांगतों न्हव का! ऐका तर. धनाजीराव आतां दोघा अट्टल चोरांच्या हातांत सांपडला हाय बगा.

रंभाजी०-ह्मणजे?

तान्या इक्कं बी उमगना? मंग देवानं तुमास्नी माज धनीसाब कशापाई केलं? अव, त्या लटक्या लेकानं आन् त्येच्या त्या थापाड्या, थेरड्या, खोट्या बापानं त्या धनाजीरावाला घ्येरला हाय, न्हवं का? आन् हीच हाय बगा लई नामी संदी. बगतां काय? मारा तिला बेगलंत आन् ठोका धूम. मल्लारपेठंत त्या अण्णारावाच्या घरीं हाय संमदी तय्यारी. ह्याच ह्मोतुरावर दोन हाताच चार हात करून टाका न् काय?

रंभाजी०-अरे पण-

तान्या-आतां मला येळ न्हाइ आपनासंग बोलाया. मी एक

घेव्यानं बागमंदी येइन. आपुन आन् कमलाताई थतं असा. मी आपनासनी घ्येऊन जाईन. तुमच्या हातून ह्यें होत नसलं तर ह्यय-नच आमच येसाजीराव. [ जातो.

**रंभाजी०**–अरे हा गेलाच. पण हेंच खरें. असलीं कामें शुभं च शीघ्रं या न्यायानें उडविलीं पाहिजेत. तिची कांहीं नाखुषी नसावी. मग काय ? हल्ला करावयाचाच. किल्ला सर केल्याशिवाय हें तोंड जगाला दाखवावयाचें नाहीं. [ जातो.

## प्रवेश ६.–विजयपुराबाहेरील एक रस्ता.

**प्रतापराव** आणि **त्राटिका** येतात.

**प्रताप०**–किती निष्ठुर आहेस तूं, प्रिये ? अग आपण आतां तुझ्या बापाच्या घरीं जावयाला निघालों आणि तूं मागेंच रेंगाळते आहेस ! हूं, पाय उचल. तुला मीं लग्न होतांच तुझ्या बापाचा वियोग कर-विला ही गोष्ट माझ्या मनाला फार खाते आहे. त्याची व तुझी भेट होऊन तुमचें तें प्रेमालिंगन केव्हां पाहीन असें मला झालें आहे. पण तुला मी वेड्यासारखा पाय उचल असें तरी काय म्हणतों ! तुझ्यानें चालवत नसेल. ही गार गार रेती या थंडीच्या वेळीं तुझ्या नाजूक पायाला खुपून तुला त्रास होत असेल. छेः, मीच निर्दय. प्रिये, माफ कर. माझ्या अंतःकरणांत भरून राहिलेल्या प्रीतीमुळें तुझ्या समागमाची इच्छा प्रबळ होऊन तिनें मला मूढ केलें. या शुभ्र स्फटिकासारख्या चांदण्यांत मंद वाहणाऱ्या व आपल्या शी-तल स्पर्शानें शरिराला सुख देणाऱ्या वाऱ्याच्या झुळुकेचा उपभोग घेत, एकमेकाशीं प्रेमकथा बोलत घटकाभर चालत जाऊं व या कष्टमय जगास विसरूं, असा विचार मीं केला. पण तुझ्या नाजूक शरिराचा मीं मुळींच विचार केला नाहीं. मी पुनः ह्मणतों, मला माफ कर.

**त्राटिका**–( आपल्याशीं ) झालें पुनः सुरू. यांच्या मनांत काय आहे कोण जाणें ! पुनः बाबांची आणि माईची भेट होऊं द्यावयाची

नाहीं असें तर नाहींना ? खरोखर त्यांना मी घरीं असतांना जो त्रास दिला त्याचें चांगलें उट्टें निघतें आहे. आणखी हा छळवाद किती चालणार कोण जाणें. माझ्याच्यानें हा सोसवत नाहीं. (उघड) आतां तरी हा चावटपणा पुरे करावयाचा. असें धड-धडीत खोटें माणसाच्यानें बोलवतें तरी कसें ? मी ह्मणे प्रीतीमुळें मूढ झालों. जसें कांहीं कोणी ह्मणेल खरेंच. अहाहा ! दिवेच ओवाळावे त्या प्रीतीवर. लग्न झाल्यापासून एक देखील सुखाचा घास खाऊं दिला नाहीं कीं झोंप येऊं दिली नाहीं, तरी यांचे आपले हे प्रीतीचे पोवाडे चालूच आहेत. अहाहा, काय गार पण वारा आणि चांदणें तरी पण किती थंड आहे हें ! या उन्हाच्या फुपाट्यांत माझ्या पायाच्या तळव्याला फोड देखील आले. अयईग ! माझ्याच्यानें आतां नाहीं बाई चालवत.

**प्रताप०**-काय, तुझ्याच्यानें चालवत नाहीं ? तर मग मघाशींच कां नाहीं तसें सांगितलेंस ? ह्मणजे तेव्हांच तुला कडेवर घेतली असती. या थंडीच्या वेळीं मला आणखी काय पाहिजे ?

**त्राटिका**-हो ! काय पण थंडी ! तरी ह्मटलें निघतांना पांघराव-याला शालजोडी कां नाहीं घेतली. या घामाच्या धारा थंडीनेंच निघत असतील नाहीं ?

**प्रताप०**-अग तूं नाजूक. एवढ्याशा चालण्याच्या श्रमानें तुला घाम आला. ह्मणून ह्मणतों ये कडेवर बैस.

**त्राटिका**-पुरेत आतां हे लाड. माणसानें खोटें तरी किती बोलावें !

**प्रताप०**-धडधडीत मला खोटें बोलतां ह्मणून ह्मणते ! ही अ-प्रतिष्ठा आपल्याला नाहीं खपत. मी पुनः ह्मणतों, हा सूर्य नव्हे, चंद्र आहे.

**त्राटिका**-मीही पुनः ह्मणतें हा चंद्र नाहीं, सूर्य आहे. मला कांहीं वेड लागलें नाहीं.

**प्रताप०**-मी साफ सांगतों असलीं नासकीं कुचकीं बोलणीं

मला खपावयाचीं नाहींत, बोलावयाचें असेल तर सरळ गोड बोलावें नाहीं तर बोलूं नये हें बरें.

**कांटिका**-सरळ आणि गोड बोलावें पण खरेंही बोलावें. या भरदोनप्रहरीं चांदणें पडलें आहे असें जर कोणीं ह्मटलें तर तें कसें कबूल करावें? अंधळीं असतें तर कदाचित् 'हो' ह्मटलें असतें. छेः, पण अंधळ्याला ऊन दिसलें नाहीं तरी अंगाला बसणारे चटके नाहीं का खरें सांगणार.

**प्रताप०**-बरें आहे तर मग. हाच माझा निश्चय. ऊन जर आहे तर या उन्हाचें चांदणें होईतोंपर्यंत येथून हलावयाचेंच नाहीं. कोण पीडा आहे पहा! ज्या त्या कामांत मोडा! हिचा आपला शब्द माझ्या उलट असावयाचाच. आतां चांदणेंचसें काय पण मध्यान्हरात्र, काळाकुट्ट अंधेर पडला आहे, किंवा नुसत्या चांदण्याच दिसताहेत, किंवा दिवस असून खग्रास सूर्यग्रहण आहे, सारांश, मी जें ह्मणेन तें आहे असें हिच्या तोंडून आल्याशिवाय येथून पाऊल पुढें टाकावयाचें नाहीं, आपल्याला कांहीं आज भूक नाहीं, खुशाल बागनबाग चोवीस तास आपण येथेंच पडून राहूं. हो, घरांत तरी काय सुख आहे! तेथेंही असेंच चालावयाचें कीं नाहीं. (खालीं बसतो.)

**कांटिका**-(आपल्याशीं) आतां बाई करूं तरी काय? यांचें ह्मणणें धडधडीत खोटें असतां कबूल कसें करूं? न करावें तर हे माझ्या जीवाचे चाललेले हाल कांहीं कमी होत नाहींत. आतां आपल्याच्यानें हे हाल सहन करवत नाहींत. अन्न नाहीं, झोंप नाहीं, यापेक्षां एकदम मरण आलेलें काय वाईट! माईच्या आणि बाबांच्या भेटीला तरी जावयाला मिळेल का नाहीं याबद्दल शंकाच. यांच्याशीं कसें वागावें ह्मणजे हे माझ्याशीं सरळ रीतीनें वागतील? आई जगदंबे, तूंच मला वाट दाखीव आणि सोडीव या जाचांतून. बरें, पण यांचें ह्मणणें कबूल केलें तर काय होईल? छेः पण असा अपमान कसा सहन करावा? आजपर्यंत मी कधीं कोणाला हार गेलेली नाहीं ती यांना

हार जाऊं ? पण त्यांना ह्मणजे माझ्या पतींनाच ना ? तेच ना या जीवाचे धनी, त्यांच्या जीवावरच ना माझ्या साऱ्या जन्माच्या सुखदुःखाच्या उड्या ? मग त्यांच्यापुढें कमीपणा पतकरण्यांत कोणती लाज ? हो. पण नेहमीं असेंच नाहींना चालणार ? यांनीं पाहिजे तें बोलावें आणि मी आपली मान त्याला मुकाट्यानें हालवावी ? छे; पण असें नाहीं व्हावयाचें. गडीमाणसांशीं बोलतांना कोठें असा प्रकार दिसत नाहीं. मग माझ्याशींच कां ? यांतच कांहीं तरी खुबी आहे. छेः बाई, मी खरोखर इतके दिवस अंधळी होतें. ज्यांच्याशीं जन्माची गांठ पडली त्यांना आपले शत्रु करून कसें चालेल ? पुरे आतां विचार. हाच निश्चय. ते ह्मणतील त्याला 'हो' ह्मणावयाचें. घरांतल्या चाकरमाणसांवर हवें तसें तोंड सोडतात, पण ते पळून कां जात नाहींत बरें ? नुसतें पोट जाळण्याकरितां कोणी इतका त्रास सोसून राहील असें वाटत नाहीं. त्यांच्यावर चाकरमाणसांची भक्तिच दिसते. कडू बोलण्याला जसें कडू उत्तर तसें गोडानें गोड कां नाहीं मिळणार ? पाहूं तर खरें. ( उघड ) ऐकलें का ?

**प्रताप०**-( आपल्याशीं ) बहुशः प्रकृति ताळ्यावर आल्याचें हें चिन्ह आहे. पण आणखी काय ह्मणते हें पाहूं या. इतक्यांतच उत्तर देऊं नये.

**त्राटिका**-ह्मटलें मी चुकलें, मला नीट दिसलें नाहीं. हें चांदणंच आहे. अगदीं कसें पिठासारखें स्वच्छ पडलें आहे.

**प्रताप०**-मला आज ऐकूं येत नाहींसें कां झालें आहे कोण जाणें !

**त्राटिका**-ह्मटलें मी हात जोडतें, पदर पसरतें. माझी चूक झाली, क्षमा करा. मी इतका वेळ अगदीं अंधळी, वेडी, मूर्ख होतें. चंद्र, सूर्य, चांदण्या, खग्रास ग्रहण, अंधारी मध्यान्हरात्र, नाहीं तर मशाल, दिवा, पणती-कांहींका ह्मणाना; मला तें अगदीं कबूल आहे. आजपासून इकडच्या बोलण्याच्या उलट माझ्या तोंडांतन एक ब्र देखील निघावयाचा नाहीं.

**प्रताप०**–कोण बोललें तें ? मला वाटतें या चांदण्यांतील गारठ्यामुळेंच मला बरोबर ऐकूं येत नाहीं.

**त्राटिका**–तसेंच असेल ! थंडी मेली कोण वाजते आहे. मीं शालजोडी घेतली नाहीं ही अगदीं चूक केली.

**प्रताप०**–तूंच का बोललीस ? अग, तूं अंधळी तर नाहींस. उन्ह कसें प्रखर पडलें आहे आणि तूं चांदणें आहे ह्मणतेस !

**त्राटिका**–खरेंच गडे, अशी कशी मी मूर्ख ? मीं चांदणें का म्हटलें याला. पायाला कसे उन्हाचे चटके बसताहेत. इतकेंच काय पण इकडून याला जें ह्मणणें होईल तसेंच तें मला दिसेल. आजपासून या आनंदीला इकडच्या डोळ्यांवांचून डोळेच नाहींत !

**प्रताप०**–तूंच का ही ? मला वाटतें दुसरी कोणी तरी आहे. अग पण तुला आनंदी हें नांव आवडत नव्हतेंना ?

**त्राटिका**–पण इकडूनच नाहीं का पहिल्या भेटीस सांगणें झालें कीं, आनंदी हें नांव फार आवडतें ह्मणून. मग मला तें कां नाहीं आवडणार ?

**प्रताप०**–आनंदी हें नाव अगदींच मिळमिळीत. मला त्यापेक्षां त्राटिका हें नांव अधिक बरें दिसतें.

**त्राटिका**–तें तर खरेंच. ज्या नांवानें मला इकडून हांक मारणें होईल तें गोड कसें नसेल ?

**प्रताप०**–( आपल्याशीं.) शाबास, प्रतापा शाबास. येथपर्यंत तर जिंकलीस. आतां हा फरक कायमचा झाला आहे कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. नाहीं तर कदाचित् बापाच्या घरीं जाण्यासाठीं हें ढोंग केलें असेल. बाकी मुद्रेवरून, कांहीं ढोंग दिसत नाहीं. आणि असल्या स्वभावाच्या माणसांना ढोंग आवडत नाहीं, आणि साधतही नाहीं. ( उघड ) प्रिये. काय सांगूं तुला ? आतांच्या तुझ्या या वागण्यानें माझें मन अगदीं आनंदानें भरून गेलें आहे. तुझा निश्चय असाच कायम ठेव म्हणजे दोघांच्याही सुखाला कांहीं कमी नाहीं. यावेळीं तुला आलिंगन दिल्यावांचून नाहींच राहवत. ( आलिंगन देण्यास पुढें सरतो. )

**त्राटिका**-( हळूच ) माझी का ना आहे ? पण कोणीं पाहिलें तर काय म्हणेल ?

**प्रताप०**-ह्मणणार काय ? तुझें माझें प्रेम फार आहे हेंच.

**शंभूसिंग** येतो.

अरे पण हो-हें काय येतें आहे ? दिव्य तेजाची चालती बोलती पुतळी, सौंदर्यलतिका, तारुण्याचा बहार, मनोरम वस्तूंचें सार, अंतःकरणाचा लोहचुंबक, अशी ही मदनमंजिरी आमच्या नशिबानें इकडेच येत आहे. ही कोण असावी बरें ? कोणी का असेना, हिचें योग्य प्रकारें आगतस्वागत केलेंच पाहिजे. प्रिये, पहातेस काय ? स्तब्ध काय उभी राहिलीस ? हिच्या या दिव्य स्वरूपाच्या तेजानें दिपावून गेलीस कीं काय ? लाडके, तिचा वाटेचा शीण घालविण्याकरितां तिच्याशीं चार गोड शब्द बोल. माझ्या या स्तोत्रानें तिच्या त्या लुसलुशीत गालावर लज्जेची व आनंदाची कशी स्पर्धा सुरू झाली आहे पहा. तिचे ते काळेभोर चंचल नेत्र ताऱ्याप्रमाणें चमकताहेत. हे देवी, तूं येथील अस किंवा स्वर्गलोकींची अस, तुला मी अत्यंत प्रेमपूर्वक अभिवादन करतों, त्याचा स्वीकार कर.

**त्राटिका**-( आपल्याशीं ) आली बाई पुनः परीक्षेची वेळ. पण काय होईल तें होवो, आपला निश्चय कांहीं सोडावयाचा नाहीं. मघांशींच जे चार प्रेमाचे गोड शब्द मिळाले तेवढ्यानेंच माझें मन किती हरखलें ! खरोखरच जवळच्या माणसांच्या प्रेमांत सुखाचा सांठा किती असतो हें मला आतांच कळूं लागलें ह्मणावयाचें. यांनीं माझे हाल केले खरे पण ह्मणूनच प्रेमाची खरी किंमत मला कळली. हे उपकार मी कसे फेडूं ?

**प्रताप०**-काय ? पुनः समंध डोकावूं लागला वाटतें !

**त्राटिका**-माझी चूक झाली, मला क्षमा करावी. बाई, तिकडून ह्मणणें झालें त्याप्रमाणें माझी अवस्था झाली होती; माझे डोळे आपल्या या अप्रतिम लावण्यानें खरोखरीच दिपून गेले होते. देवाची आपल्यावर पूर्ण कृपा ह्मणूनच आपल्याला हें सौंदर्य त्यानें

ऱ्ले. नका बाई तुम्ही अशा उघड्या बाहेर पडत जाऊं. मुली :कार्याची दृष्ट मोठी वाईट असते. ज्यांच्या आपण उदरीं आलां या खरोखरींच मोठ्या धन्य! हें असलें रत्न निरंतर ज्याच्याजव- ळ राहणार त्याचें भाग्य तर पुसूंच नये.

**शंभू०**-म्हाताऱ्याची तुह्मीं थट्टा चालविली आहे, याची तुह्मांला कांहींच लाज वाटत नाहीं. अरे, तुमचा मी बाप शोभेन!

**प्रताप०**-खरेंच आनंदी, अशी कशी तूं अगदीं वेडी झालीस? अग यांना का तूं तरुण सुंदर स्त्री ह्मणतेस? हे अगदीं वृद्ध गृहस्थ आहेत. यांचा तो सुरकुतलेला, सुकट चेहरा तुला दिसत नाहीं?

**वाटिका**-खरेंच कीं! अरेरे, मोठी चूक झाली. आजोबा, या पोरीला क्षमा करा. या उन्हामुळें माझे डोळे दिपून जाऊन मला कांहींच दिसत नाहींसें झालें होतें. या मुलीचा अपराध पोटांत घाला. ही पहा मी तुमच्या पायां पडतें.

**प्रताप०**-आजोबा, करा तिचा गुन्हा माफ. वास्तविक पाहतां याचा आपल्याला राग येऊं नये. कारण म्हाताऱ्या माणसांना तरुण ह्मणवून घेण्यांतच विशेष आनंद वाटतो. आणि यामुळेंच तर नाना- प्रकारच्या घाणेरड्या औषधांचा केसांना कलप करण्यासाठीं खप होतो. पण थट्टा राहूं द्या; आपण तिच्या अपराधाची क्षमा करा, आणि आपण कोठें चाललां आहां तें कृपा करून सांगा. ह्मणजे तुमची आमची वाट एकच असली तर सोबतीनें जाऊं.

**शंभू०**-राव, आपण व आपली स्त्री दोघेंही थट्टेखोर दिसतां. तथापि तुमचा हा नम्रपणा पाहून माझा राग गेला. बाकी तुम- चा थट्टेचा प्रकार कांहीं विलक्षणच. असो; मी जातों आहें कुसुम- पुराला. तेथें माझा मुलगा असतो त्याला भेटावयाचें आहे

**प्रताप०**-त्याचें नांव काय बरें?

**शंभू०**-त्याला रंभाजी ह्मणतात.

**प्रताप०**-वाः तर फार मौज झाली! आपल्या मुलानें या मा- झ्या लाडकीच्या धाकट्या बहिणीला मागणी केली आहे आणि तिच्या बापानेंही मुलगी देण्याचें कबूल केलें आहे. आह्मीं त्यां- च्याच लग्नाला चाललों आहों. तेव्हां तुमचा आमचा निकट

संबंध होणार. हिची बहीण हिच्यासारखीच सुंदर असून फार सुशील आहे. आपले चिरंजीव मोठे नशीबवान् खरे.

**शंभू०**-काय म्हणतां ? माझ्या मुलानें मागणी केली आणि लग्नही व्हावयाचें ठरलें ! मला वाटतें मथांप्रमाणेंच आपण माझी-ही कांहीं तरी थट्टा करतां आहां.

**प्रताप०**-छेः हो, बिलकुल नाहीं. चला आतां लवकर जाऊन कुसुमपूर गांठूं. प्रिये, तो पहा पिल्या घोडीं घेऊन उभा आहे.

**त्राटिका**-( आपल्याशीं ) आनंदी, बहुशः तुझे दुःखाचे दिवस सरले. निश्चय मात्र ढळूं देऊं नको.

## प्रवेश ७.-धनाजीरावाच्या घराच्या पिछाडीचा बाग.

**रंभाजीराव, कमळा** आणि **तान्या** येतात.

**कमळा**—( आपल्याशीं ) माझ्या छातींत एकदम गोळा येऊन ढडपल्यासारखें कां झालें आहे ? मी करतें आहें हें चांगलें आहे ना ? माझे पाय लटपट कापूं कां लागले आहेत ? ( उघड ) झटलें मला बाई कसेंसेंच व्हावयाला लागलें आहे.

**रंभाजी०**—( तिला सांवरून धरून ) अग वेडे, अशी भितेस कां ? मी आहेना तुझ्याजवळ. दोन घटका धीर धर, कीं हा रंभाजी तुझा पालक होईल.

**तान्या**-धनीसाब ! येथपातूर ठीक जुळलं; पण देवाच्यान त्यो बामन जवा आपल्यावर आणि बाईसाबावर अक्षित्या फेंकील तवाच माझा जीव खालीं व्हईल बगा. हूं, निघा आपण आतां. वेळ घालवूं नका. थतं सारं तयार हाय.

**रंभाजी०**-हे निघालोंच आह्मी. कमळे, अशी घाबरली आहेस कां तूं ? तुला सांगितलेंना कीं तुझ्या बापानेंच तुला रंभाजीरावाला द्यावयाची असें मला निक्षून सांगितलें. चल, आतां पाय उचल. नाहीं तर पुनः त्यांचें मन फिरेल. तो रणधीरराव तर टपून बसलाच आहे. अरे, पण मावशी कोठें आहेत ? त्या आल्याच वाटतें. चला, पाय उचला. [ सर्व जातात.

# अंक पांचवा.

## प्रवेश १—कुसुमपुरांतील एक रस्ता.

**प्रतापराव, त्राटिका, शंभूसिंग** आणि चाकर येतात.

**प्रताप०**—शंभूसिंगजी! हेंच आपल्या मुलाचें घर. हा दरवाजा. धनाजीरावांचें घर जरा पलीकडे आहे, तिकडे मला गेलें पाहिजे. येऊं तर? रजा? रामराम.

**शंभू०**—तें व्हावयाचें नाहीं. आमच्या घरांत येऊन थोडेंसें साखरपाणी घ्या, वाटेचा थकवा घालवा आणि मग घरीं जा. तुह्मांला तसें जाऊं दिलें तर माझा रंभाजी माझ्यावर रागावेल. (दार ठोठावून) दार उघडा, दार.

**म्हातारा**—(दुसऱ्या मजल्याच्या खिडकींतून) कोण आहे तें? दार फोडतां कीं काय? हळू ठोकावयाला येत नाहीं वाटतें?

**शंभू०**—हा कोण म्हातारा? आंत रंभाजी आहे काय?

**ह्मातारा**—नीट विचारावयाला येत नाहीं काय? रंभाजीराव ह्मणतां तर दांत झिजले असते वाटतें? ते आंत आहेत पण गांठ पडावयाची नाहीं.

**शंभू०**—हा कोणी नवा चाकर ठेवला आहे वाटतें? धन्याचा अभिमान तर खूप आहे. असो. जरा गंमत करूं. अहो त्यांची गांठ पडावयाची नाहीं म्हणतां? मी त्यांच्या गांवचा एक गरीब ह्मातारा आहें. मेहरबानी करून त्यांना निरोप तर कळवा.

**प्रताप०**—असें नको. (खिडकींतील **ह्माताऱ्याकडे** पाहून) अहो बुढे गृहस्थ! रंभाजीरावांना सांगा कीं, आपले वडील दाराबाहेर आले आहेत ह्मणून.

**ह्मातारा**—काय म्हणतोस तूं? त्यांचे वडील दाराबाहेर उभे आहेत! अरे चोरा! हा पहा त्याचा बाप मी येथें खिडकींत उभा आहें. तुह्मीं चोरांनों, ही भलतीच थट्टा आरंभिली आहे. संभाळा!

**शंभू०**—आपण त्याचे वडील काय?

**म्हातारा**—हो हो! मीच त्याचा वडील. त्याच्या घरांत विचारा हवें तर.

**प्रताप०**—म्हातारेबुवा! मी आपल्याला संभावीत समजत होतों, पण आपण अगदीं अट्टल ठग दिसतां! दुसऱ्याचें नांव चोरावयाचें आं? खूप केलीत बुवा!!

**म्हातारा**—अरे बघतां काय? पकडा चोराला. बांधा मुसक्या. अरे हरामखोरा! माझ्या नांवानें या गांवांत कोणाला तरी गंडा घालावयाला पहात होतास काय?

**तान्या** येतो.

**तान्या**—(आपल्याशीं) धनीसाबांचं लगीन झालं पन अजून त्यंनीं बाईसाबांच्या बापाला कळिवलं न्हाइ, तवां आता ह्यें व्हनार तरी कसं? पन त्येचं काय आपल्याला? धनीसाबांनीं मी इकच्य.त येतो म्हुन येसाजीला कळवाया सांगिटलया. (पुढं पाहून) अरे पन! ह्यें काय लिचांड! ह्ये तर थोरल धनीसाब? आता मातुर आली पंचात. ह्यें खेंगटं लई वंगाळ?

**शंभू०**—कोण तें? तान्या, इकडे ये पाहूं.

**तान्या**—(आपल्याशीं) आतां कसं करावं? यास्नी वळखावं का वळखूं नवे? वळखूं नवे ह्यंच बरं. धाकंट धनीसाब घ्येतील सांवरून. (उघड) कां लई ताञ्यानं बोलावतासा? कोन वो तुह्मी अस? मला वाटलं तर येईन न्हाइ तर येनार न्हाइ! ऐकलं कां बुढ्ढेबुवा?

**शंभू०**—गाढवा! येनोस का नाहीं! मला ओळखत नाहींस वाटतें?

**तान्या**-तुला वळखत न्हाइ? त्ये कां! हाएस की मला ठावा. त्या लोनारगल्लींत त्या लोनाऱ्याच्या हत गाढव हाकीत व्हतास न्हव का?

**शंभू०**—अरे हरामखोरा! पाजी! तुझ्या धन्याच्या बापाला ओळखत नाहींस?

**तान्या**—थोरल्या धनीसाबांस्नी व्हय? अनू त्येस्नी कशापाई वळखनार न्हाइ? त्ये पहा त्ये! त्या खिडकींतून बघत्याती न्हव!

**शंभू०**-असें काय? बरें आहे. तूं असा नाहीं ओळखावयाचा. (**तान्यास** मारतो.)

**तान्या**—धांवा, धांवा! खून, खून! मेलों, मेलों! ह्यो येडा माझा जीव घेतोया!

[**शंभूसिंगा**च्या हातून निसटून पळून जातो.

**झातारा**-रंभाजी, धांव! धनाजीराव, धांवा! हा कोणी चोर माझें नांव चोरून दांडगाई करीत आहे.

[खिडकी सोडून आंत जातो.

**प्रताप०**-लाडके, आपण बाजूला उभीं राहून ही मजा पाहूं. तुझे वडीलही येथेंच आहेतसें दिसतें. त्यांची गांठ घ्यावयाची का?

**त्राटिका**-अगबाई, बाबा का येथें आहेत? तर मग अशीच घरीं जाऊं या.

**प्रताप०**-थांब, ही मजा पाहून मग जाऊं.

[दोघेंही एका अंगास जातात

**झातारा, धनाजीराव, येसाजी**, चाकर वगैरे येतात.

**येसाजी**-अहो वृद्ध! आमच्या गड्याला तुह्मीं कां मारिलें कोण तुह्मी.?

**शंभू०**-मी कोण? चोरा! तूं मला विचारणारा कोण? अ-बब्ब! काय लेकाचा झोंक तर पहा! डोक्याला ऐटबाज मंदील, अंगांत रेशमी जगीचा बुट्टीदार अंगरखा, मखमालीची विजार! येथें कांहीं तरी हरामखोरी आहे.

**येसाजी**-कां झातारेबुवा? विवळतांसे?

**धनाजी०**-त्याचें डोकें फिरलें आहे वाटतें!

**येसाजी**-अहो वृद्ध गृहस्थ, आपण वरल्या थाटावरून पोक्त व संभावीत दिसतां; पण आपली कृति शुद्ध वेड्यासारखी कशी! मीं थाटामाटाचा पोषाख केला, मोत्यांचीं पेंडीं लटकाविलीं तर त्यांत आपलें काय वेंचलें? माझ्या वडिलांची ऐपत आहे आणि त्यांचा मजवर लोभही तसाच आहे.

**शंभू०**-तुझा बाप ! अरे, दोऱ्या वळतां वळतां त्याच्या हाताला घट्टे कीरे पडले ! काय त्याची ऐपत ! तुझ्या पाठीवर कोरडे उड-वावयाला दोरी मात्र त्याजवळ सांपडेल.

**धनाजी०**-अरेरे ! हे अगदींच भकले ! यांचें नांव आपण काय आहे असें समजतां ?

**शंभू०**-वाः जसें काय मला तें ठाऊकच नाहीं ! माझ्या घरीं माझ्या मुलाबरोबर हा लहानाचा मोठा झाला. येशा, पुरे आतां ही थट्टा. रंभाजी कोठें आहे ?

**ज्ञातारा**-आतां मात्र सीमा झाली. थेरड्या ! हा गाढवपणा पुरे ! मुकाट्यानें चालता हो ! याचें नांव रंभाजीराव आणि मी त्याचा बाप शंभूसिंग हें साऱ्या जगाला माहीत आहे.

**शंभू०**-शिव, शिव ! घात झाला ! या चोरांनीं माझ्या मुलाचा खून केला खचित. अहो पाहतां काय ? यांना पकडा. हे अट्टल हरामखोर आहेत. यांना कोतवालाकडे नेलें पाहिजे. अरे मांगांनो, बोला माझा रंभाजीराव कोठें आहे ?

**ज्ञातारा**-कोण आहेरे ? कोतवालाला घेऊन या. कोतवालींत नेऊन चांगला लंबे केल्याखेरीज हा शुद्धीवर यावयाचा नाहीं.

**तान्या व रंभाजी** येतात.

**तान्या**-धनीसाब ! त्ये बगा थतं हायत थोरल धनीसाब ! ल-ई तापून गेल्याती.

**रंभाजी०**-( एकदम जाऊन **शंभूसिंगा**चे पाय घट्ट धरून ) बाबासाहेब, क्षमा करा !

**शंभू०**-अरे ! हा माझा मुलगा रंभाजी ! बाळा, तुला उदंड आयुष्य असो ! मला एकदां कडकडून भेट. ( त्याला वर उचलून पोटाशीं धरतो. )

[ **तान्या, येसाजी व ज्ञातारा** आंत जातात.

**धनाजी०**-पुराणीकबोवा ! हें काय वेड आहे ?

**शंभू०**-पुराणीक ? रंभाजी, अरे तूं पुराणीक केव्हां झालास ? येशाचा रंभाजी, तो थेरडा शंभूसिंग आणि तूं पुराणीक ! हें आहे तरी काय ? मला वाटतें या गांवचे लोक सगळेच वेडे बनले आहेत.

**रंभाजी**०-बाबा, सगळे वेडे नाहींत. मी मात्र वेडा बनलों होतों आणि तो यांच्या धाकट्या मुलीच्या जादूमुळें.'

**धनाजी**०-ह्मणजे ? तुह्मी पुराणीक नाहीं तर एकून ?

**रंभाजी**०-अहो, त्या पुराणिकाचा अवतार संपला, कारण ज्याकरितां अवतार घेतला होता तें कार्य झालें.

**शंभू**०-कोणतेंरे तें कार्य ?

**रंभाजी**०-रंभाजीचें आणि कमळेचें लग्न !

**धनाजी**०-येथें कांहीं तरी दगलबाजी आहे. रंभाजीरावाला मुलगी देण्याचें मीं कबूल केलें आहे खरें; पण लग्नाचा मुहूर्त उद्यांचा धरला होता. मग लग्न झालें असें कसें ह्मणतां ?

**रंभाजी**०-मीच रंभाजीराव ! आपण ज्याला रंभाजीराव समजतां तो येसाजी, माझा बाळपणचा मित्र. आपण कालच नाहीं मला सांगितलें कीं रंभाजीरावाचें आपल्या मुलीशीं लग्न व्हावयाचें. असा निश्चय ठरला ह्मणून मावशींना कळीव ह्मणून. त्या आपल्या परवानगीप्रमाणें मीं रंभाजीनें आपल्या मुलीशीं कालच लग्न लावलें. मावशी होत्याच तेथें, त्यांना विचारा पाहिजे तर.

**धनाजी**०-यांत कपट आहे. ठीक आहे. मला फसविलें काय तुह्मीं ? पाहून घेतों. या राज्यांत असा अन्याय चालावयाचा नाहीं ह्मटलें. चोर, दगलबाज नाहीं तर. हा चाललोंच असा कोतवालाकडे. ( रागानें जाऊं लागतो. )

**शंभू**०-अहो, तुमचे केस पिकले, माझे केस पिकले. या वयांत कोतवालाकडे आपल्या घरच्या भानगडी घेऊन जाणें शोभत नाहीं. माझ्या मुलानें तुमच्या मुलीशीं लग्न लावलें ना? ठीक आहे ! त्यांत काय वाईट झालें ? त्यानें तुह्मांला न कळवतां ही गोष्ट केली हा त्याचा अपराध झाला खरा, पण त्याबद्दल त्याचे कान उपटले ह्मणजे झालें. ( **रंभाजीरावाचा** कान धरून ) रंभ्या, पड मामासाहेबांच्या पायां. त्यांनीं क्षमा केल्याशिवाय त्यांचे पाय सोडूं नको. ( **रंभाजीराव धनाजीरावांचे** पाय धरतो. ) धनाजीराव, नका आतां ओढून धरूं. करा त्याला क्षमा आणि द्या आशीर्वाद. तुमची मुलगी राजीखुषीनें त्याच्याशीं लग्न लावून

घ्यावयाला गेली हें लक्षांत आणा. माझ्या मुलाला आपली मुलगी तुह्मीं देणारच होतां. आतां येसाजीपेक्षां हा कितीपटीनें चांगला आहे हें तुह्मीं पहातच आहां. त्या ह्मातान्याबें पैशासंबंधानें जें जें तुह्मांला सांगितलें असेल, तें खरें करून देण्याला हा शंभूसिंग तयार आहे. हुं. आतां याच तुमचा आशीर्वाद.

**धनाजी०**–तुमचें ह्मणणें सरळ दिसतें. तरी पण याचा आणखी विचार झाला पाहिजे. रंभाजीराव, उठा. ( **रंभाजीरावाला** वर उचलतो व भेटतो. )

**शंभू०**–चला आतां आंत. त्या येशाचे चांगले कान उपटले पाहिजेत. लेकानें किती बेशरमपणानें माझ्या तोंडाला तोंड दिलें.

[ **शंभूसिंग धनाजीरावाला** आंत नेतो.

**रंभाजी०**–झाला एकदांचा शेवट गोड. असे प्रेमळ बाप या जगांत कितीसे असतील ! [ जातो.

**प्रतापराव व त्राटिका** पुढें येतात.

**त्राटिका**–चलावयाचेंना आतां घरीं. उभें राहून राहून माझे पाय बाई दुखूं लागले ! नाहीं तर बाबा पटदिशीं बाहेर येतील. दोघांना येथें पाहिलें तर काय ह्मणतील ?

**प्रताप०**– अगोदर एक साखरेचा !

**त्राटिका**–इथेंच ? रस्त्यांत ? इश्शग बाई ! मला बाई लाज वाटते.

**प्रताप०**–तुझ्या नवऱ्याची तुला लाज वाटते ?

**त्राटिका**–हें काय भलतेंच ? असें का मीं ह्मटलें ? पण भर रस्त्यांत ? कांहीं तरी बाई ह्मणावयाचें झालें !

**प्रताप०**–ठीक आहे तर मग. चला आपण परत आपल्या गांवाला जाऊं आणि मग घरीं दारें लावून घेतल्यावर तर कोणी बघणार नाहीं ! पिल्या, चल घोडीं घेऊन परत.

**त्राटिका**–आलें का पुनः हें ? एखाद्याला छळण्याचा कंटाळा तरी बाई कसा येत नाहीं ! बरें तर, आपल्या ह्मणण्याप्रमाणें कां होईना. मला काय त्याचें ? इकडेच नांवें ठेवतील !

**प्रताप०**–अग वेडे, असें झाल्यानंतर छळण्याचें काय कारण ?

उशिरानें का होईना,पण तुझे डोळे उघडले, हें पाहून ह्या जिवाला किती, पण आनंद झाला आहे! आता तुला खरेंच सांगतों, कीं आजपासून तुझ्या व माझ्या सुखाला सीमा नाहीं. प्रतापराव, हा तुझा दास. तुला यत्किंचितही दुखवणार नाहीं.

[ जातात.

## प्रवेश दुसरा.

**पिल्या** रस्त्यानें जात आहे.

**पिल्या**–धनीसाबांनीं सांगितलंया की राणोजीरावांच्या घरीं जाऊन त्ये आले असले तर त्येंना आन त्यांच्या अंतुरीला धनाजीरावांच्या हत आज मेजवानीला बलावलंया म्हुन सांग. आज अक्षी काय मौज हाय. रंभाजीरावाचा ह्यातारा लई उमदा मानूस. त्येनं धनाजीरावाचा राग पन कसा एका खिनांत घालिवला अक्षी. आन आज समद्यासनी चमचमीत मेजवानी हाय. रंभाजीराव, आमच धनी, आन राणोजीराव हीं तीन ताजीं जोडपीं जमनार हैत. आन काय, रंग हाय. आं? हाच न्हव का त्यो वाडा? हतच आमच्या धनीसाबांनीं पहिल्या परतम तळ दिला आन आपल्याला नीट बोलाया येईना म्हुन मला बदाड बदाड बदाडलं. चला, आंत जाऊनशान् राणोजीरावांस्नी आवातन देऊं या. ( आंत डोकावतो. ) पैन इक्त्यामंदि आंत जाऊं नग्ये. बगू या तर खरं आमच्या राणोजीरावांचं आन त्येंच्या अंतुरीचं कस काय परेम हाय त्यें. आं? पन आमंदि राणोजीराव आन एक आवा लई मोठ्यानं बोलत्याती—भांडान चाललया जनु. तर मंग बगू या गम्मत हतंच दडूनशान. ( कोपऱ्यांत उभा रहतो. )

**राणोजीराव** आणि **सारजा** येतात.

**सारजा**–मी साफ सांगतें हें माझ्या पसंतीला पडायचें नाहीं.

**राणोजी०**–अग पण ऐकशील कीं नाहीं. मी उद्यां त्या मारवाड्याकडे जाऊन तुला दुसरी चांगली ठुमकेदार पैठणी आणून देतों. ( तिच्याजवळ जाऊन हनुवटीला हात लावतो. )

**सारजा**–( हात झिडकारून ). अहाहा! मोठे उपकारच कीं

नाहीं ! पण अगोदर लांब उभे रहा पाहूं. आणि मी पुनः निक्षून सांगतें कीं पैठणी आज आली नाहीं तर जेवावयाला मिळावयाचें नाहीं.

**राणोजी०**–पण असें काय करावें तें ! माझी लाडकी तूं !

**सारजा**–हं खबरदार ! मला असल्या लघळपणा उपयोगी नाहीं. पण अगोदर सांगा, पैठणी आज येते आहे कीं नाहीं ?

**राणोजी०**–कोण त्रास आहे बोवा हा ! काय ह्मणतेस तूं ?

**सारजा**–कान आहेत का खोगेरें आहेत ? इतका वेळ सारखी कानीं कपाळीं ओरडतें आहे तरी चोमड्यासारखें 'काय ह्मणतेस तूं ?' हें आहेच वरतीं. आतां तरी नीट ऐका काय ह्मणतें ती. ( त्याच्या कानाशीं मोठ्यानें ओरडून ) ह्मटलें, पैठणी आल्याशिवाय अन्न मिळावयाचें नाहीं. आतां आलें का नीट ऐकूं ?

**राणोजी०**–( मोठ्यानें ) बरें बरें, आलें ऐकूं. ( आपल्याशीं ) आतां जरा रागाची ऐट आणली पाहिजे. ( उघड ) कोण केद्राशीण आहेस ग तूं ! केवढ्यांदा कानांत ओरडलीस ? माझे कान कांहीं फुटले नाहींत.

**सारजा**–अस्सें अस्सें ! राग आला वाटतें ? एकंदरींत स्वारींना राग आहे तर मग. मला तर वाटूं लागलें होतें कीं इकडे राग किंवा लाज यांतलें कांहींच नाहीं. आणिक कसें ह्मटलें ? आपले कान फुटले नाहींत का ? बरेंच झालें. औषधें घालण्यांची किटकिट आणि एकाद वेळ उगीच आपले कान लाडिकपणानें धरावेसें वाटलें तर हाताला घाण लागावयाला नको. ( हळूच त्याचा कान उपटते. )

**राणोजी०**–( आपल्याशीं ) ही आतां फार फाजील जावयाला लागली. हिला चौदावें रत्नच दाखविलें पाहिजे. जय प्रतापराव की ! ( चाबूक घेतो. ) अग, दूर उभी रहा. खबरदार माझ्या अंगाला हात लावशील तर ! हें पाहिलेंस का माझ्या हातांत काय आहे तें ? चामडी लोळवून टाकीन !

**सारजा**–अबबबब ! किती तरी जोराचें हें बोलणें ! खरेंच बाई, पुनः एकदां बोला तें. मला ऐकूं देच. असें सांगतात कीं अगोदर

बोलावयाला शिकावें ह्मणजे मग एकादे प्रसंगीं खरोखरीच अंगांत अवसान आलें तर येईल. पण पुनः एकदां मघाच्यासारखें बोला गडे.

**राणोजी०**-हां हां, तोंड आटप. आतां हा नेहमींचा राणोजी नव्हे, सांगतों. माझा राग मोठा कठिण आहे. एकदां आला कीं तो शांत होत नाहीं.

**सारजा**-अगबाई, खरेंच कां? तर मग तो अपूर्वाईचा राग मला पाहिलाच पाहिजे. आतांची वेळ गेल्यावर पुनः केव्हां दृष्टीस पडेल कोण जाणें! नवानवसानीं आला आहे म्हणावयाचा.

**राणोजी०**-( आपल्याशीं ) ही अजून ऐकत नाहीं. कोरडा उडवावाच आतां. प्रतापरावा, तूं माझा गुरु आहेस या कामीं. धांव या वेळीं मला जोर द्यावयाला.

**सारजा**-असा काय बाई तो उशीर करावयाचा! तो राग विरघळून जाईल देखील.

**राणोजी०**-नाहीं ऐकत तूं. घे तर मग हें बक्षीस! (असें ह्मणून चाबूक उगारतो. ती चटदिशीं त्याच्या हाताला बिलगून चाबूक हिसकावून घेते.)

**सारजा**-अगबाई याला का बक्षीस ह्मणतात? मला बायकोला मेलें तें बक्षीस काय करावयाचें? आपणच घ्यावें तें. ( त्याच्या अंगावर कोरडा उडवते. )

**राणोजी०**-मेलों मेलों, मेलों. धांवा, धांवा. मला सोडवा य राक्षशिणीच्या हातून.

**पिल्या**-( आपल्याशीं ) ही वेळ आंत घुसायला लई नामी हाय. ( आंत शिरून ) ह्यो आलो बगा! कोन चोर हाय तो. त्येला चांगला लंबेच करतो. ( **राणोजीरावावर** दोन तीन कोरडे उडवतो. )

**सारजा**-मेल्या चोमड्या! आमचा दोघांचा एकांतांत शृंगार चालला असतां तुला मध्यें घुसावयाला कोणीं सांगितलें? आं. घे तर हें बक्षीस! ( त्याला मारते. )

**राणोजी०**-शाबास लाडके, असेंच पाहिजे. कायरे, आमच्या एकांतांत कां आलास तूं?

**पेल्या**–नग नग नग बगा, लई झालं. तुमी जनु अक्षी आमच्या तर्टिकाबाईच. राणोजीराव! लई रमांग आवा काडलीसा हुडकूनशान.

**सारजा**–चोरा, कोणतीरे ती त्राटिकाबाई? दुसऱ्या बायकोची आणि माझी बरोबरी करतोस होय? थांब, तुला थोडी अक्कल शिकवितें. (चाबूक उगारते.)

**पिल्या**–न्हाइ मी चुकलो बाईसाब! तुमास्नी मी म्हंगालो की तुमी सवाई तर्टिका दिसता. आमच्या आताच्या तर्टिकाबाई तुमच्या म्होरं कसच्या टिकतात!

**राणोजी०**–(अंग चोळीत) पण पिल्या, तूं आलास कसा येथें?

**पिल्या**–दारांतून आलो जी.

**राणोजी०**–तसें नव्हे. तूं जो आलास तो कशासाठीं?

**पिल्या**–कशापाई ह्मंजी? तुमी आमच्या धन्यांच मितर. तवा तुमास्नी व तुमच्या बाईसाबास्नीबी मुजरा कराया आलोन् काय. बाईसाबांस्नी पाहून देवाच्यान् दिल खुस झाला बगा.

**सारजा**–मेल्या हलकटा! माझें नांव काढतोस का आणखी?

**पिल्या**–न्हाइ बाईसाब. तुमच नांव मी कशापायीं काढूं जी?

**राणोजी०**–पिल्या, पण अगोदर तूं कां आलास तें सांग. पुरे कर चावटपणा तुझा.

**पिल्या**–न्हायलं. धनीसाबांनीं हुकूम केला म्हुन आलो.

**राणोजी०**–प्रतापरावाचा काय निरोप आहे?

**पिल्या**–धनीसाबांनीं असं सांगितलं, ‘ पिल्या, गधड्या. राणोजीरावाकड जा. आन् त्येंना ह्मंगावं आज संमदी मितरमंडळी मेजवानीला यायची हाय! त्यापायीं त्येंना आन् त्येंच्या त्यों नया अंतुरीला म्होरं घालुनशान् आण.’

**सारजा**–कोणरे मेल्या हा तुझा धनी उर्मट आहे!

**राणोजी०**–अग राहूं दे तें. पण तूं येशीलना मेजवानीला?

**सारजा**–कोण मी? माझें अडलें आहे खेटर.

**राणोजी०**–अग, असें काय ह्मणतेस, बरें? प्रतापराव माझा फार जुना दोस्त. त्यानें बोलाविल्यावर गेलेंच पाहिजे.

**सारजा**–तुमचे दोस्त असतील तर तुह्मी जा. माझा काय संबंध?

**राणोजी**०–अग माझ्याकरितां तरी चल.

**सारजा**–काय करावयाचें तुमच्याकरितां येऊन? तुह्मी थोडेंच ...झें काम करतां आहां!

**राणोजी**०–काय बरें? काय बरें काम करीत नाहीं?

**सारजा**–पुनः हें आहेच का? त्या पैठणीबद्दल माझे दांत किती ...री झिजले.

**राणोजी**०–बरें बाई, देतों आणून पैठणी आतांच्या आतां. ...ग तर येशील?

**सारजा**–हें पुनः विचारावयालाच पाहिजे वाटतें!

**राणोजी**०–पिल्या, तूं हो पुढें. आह्मी मागून आलोंच ह्मणून ...ग.

**पिल्या**–बिगि बिगि या बगा. रंबाजीरावाच्या हतं यायचं बरं ( जातांना ) आन् त्या तुमच्या बयाचं तोंड जरा गोड करा.

[ जातो.

**राणोजी**–बरें मी जातों आणि पैठणी घेऊन येतों. घरीं संभाळ बरें का.

**सारजा**–खुशाल जावें. घरची कांहीं काळजी करूं नका. मी खंबीर आहे.

[ तो बाहेर जातो, ती घरांत जाते.

---

## प्रवेश ३.–रंभाजीरावांचा दिवाणखाना.

**रंभाजीराव, प्रतापराव, राणोजीराव** व **येसाजी** बाहेर बसले आहेत; आंतल्या अंगास **त्राटिका, कमळा** व **सारजा** उभ्या आहेत. **तान्या** व **पिल्या** एका बाजूला उभे आहेत.

**प्रताप**०–आजचा एकंदर थाट चांगला उडाला. मोठी मौज झाली. गाणेंही ठीक होतें. का राणोजी, तुला कसा काय आजचा बेत आवडला.

**राणोजी**-बेत काय विचारावा ? बहुत उमदा. ही सारी वहि-नींचीच का व्यवस्था ?

**प्रताप०**-अरे यांत काय संशय ?

**राणोजी०**-मला बोवा हें खरें नाहीं वाटत.

**त्राटिका**-कां बरें, भावोजी ?

**रंभाजी०**-वहिनी, कां तें सारें जग सांगेल.

**त्राटिका**-वाहवा, आपणच असें ह्मटल्यावर मग लोकांना काय बोल लावावयाचा ?

**कमळा**-पण ताई त्यांत वावगें बोलणें तें काय झालें ?

**त्राटिका**-हें उसनें फेडून घेते आहेस वाटतें मागच्याबद्दलचें ?

**सारजा**-अहो या बाई ह्मणतात तशा जर तुह्मी असाल तर मग तुमचें आमचें खास पटणार !

**प्रताप०**-राणोजी, माझ्या मात्रेचा तुला बराच उपयोग करावा लागत असेल. कारण प्रकरण जरा जबर दिसतें. ( **सारजे**कडे पहातो. )

**सारजा**-कोणाची जरब आणि मला कीं काय ? मी नाहींहो कोणाच्या धाकांत रहावयाची !

**प्रताप०**-वहिनी ! आपण आहांतच तशा हुषार ! पण माझ्या बोलण्याचा अर्थ नाहीं आपल्या लक्षांत आला ! मी ह्मणतों कीं आमच्या राणोजीरावांना आतां दुसऱ्या कोणाची धास्ती बाळगावयाला नको. म्हणूनच मी त्यांना विचारीत होतों कीं असे दावरल्यासारखे कां दिसतां ?

**सारजा**—ठीकच आहे ! ह्मणतात ना-आपल्यावरून जग ओळखावयाचें ! का आनंदीबाई, असेंचना ?

**त्राटिका**—या बाई आपापल्या अनुभवाच्या गोष्टी आहेत. राणोजीभावोजींचा अनुभव कसा आहे तें मी काय सांगूं ?

**प्रताप०**--शाबास, आनंदी ! जबाब फारच खुबीदार दिलास. तें पहा, त्या राणोजीनें तोंड कसें केलें आहे तें. त्यावरूनच त्याचा अनुभव स्पष्ट दिसतो.

**सारजा**—अहाहा ! कसें साजरें करून घेतांहेत पहा. आमच्या

ुडे हीं देखील अक्कल नाहीं. पण भावोजी, किती साजरें केलें ी खरें कांहीं लपत नाहीं:

**रंभाजी०**-प्रतापराव, या जबाबांतला चुरचुरीतपणा आपल्याला ासा काय रुचतो?

**राणोजी०**-अहो, तुह्मी नुसतें तिचें बोलणें ऐकत रहा.

**त्राटिका**-सारजाबाई, खरें लपत नाहीं ह्मणतां असें खरें तें ोणतें?

**सारजा**-अहाहा! ठाऊकच नसेल जसें कांहीं. बरें तर ीट लक्ष लावून ऐकाहो. साऱ्या जगाला ठाऊक आहे कीं प्रता-रावांच्या गळ्यांत एक कजाग आणि द्वाड घोरपड पडली आहे ह्मणून, तेव्हां आपल्याप्रमाणेंच सारे आहेत असें त्यांना वाटतें. दुसरें काय? समजलें का आतां? का आणखी पाहिजे उलगडा करावयाला?

**कमळा**-ताई, आलें बोंगडें गळ्यांत! आपण होऊन आपली फजिती करून घेण्यांत काय शहाणपण!

**रंभाजी०**-अग, तूं असें बोलूं नयेस. तुझी ती वडील बहीण ना?

**त्राटिका**-भावोजी, बोलूं दे तिला. मी ह्मणतें ती मला कांहीं बोलली तर त्यांत मला दुःख नाहीं. पण आपण मात्र संभाळाहो.

**सारजा**-कोणाला खरोखरीच संभाळावें लागेल याबद्दल आ-नंदीबाई आपण तरी निदान बोलूं नये.

**राणोजी०**-शाबास, तरी ह्मटलें, आमची आहे. का प्रतापराव, कसें आहे काम? पाहूं यावर आनंदीबहिनींचें काय उत्तर येतें तें.

**सारजा**-पुरे पुरे! आपली नको मध्येंच लुडबूड!

**त्राटिका**-झालें, भावोजी? मला उत्तर देण्याची जरूरच रा-हिली नाहीं. आणि उत्तर पाहिजेच असलें तर पिल्याला बोलावूं का? तो आज सकाळच्याबद्दल कायसेंसें ह्मणत होता.

**राणोजी०**-(आपल्याशीं) हें प्रकरण आतां गळ्यांत येतेसें दि-सतें. आपण लवकर घराचा मार्ग सुधारावा हें बरें.

**रंभाजी०**-वहिनी काय ह्मणतात हो हें? राणोजीराव, हें काय आहे आम्हांला कळूं द्या तरी.

**प्रताप०**–त्यांना नका विचारूं. त्यांची आतां दांतखिळी बसल्यामाग्खी हिंमत आहे! मला वाटतें ती उघडण्यासाठीं त्यांना हुक्का प्यावयाला द्या, म्हणजे कदाचित जोर येईल.

**सारजा**–इश्श बाई, आतां येथें सारा घाणेरडा धूर भरून जाणार. आपण आपल्या आंत जाऊं कशा.

**त्राटिका**–अस्सें अस्सें! आतां आंत जावयाची इच्छा झाली का? आपल्याला कोणता धूर झोंबला तें आह्मांला कळलें बरें का!

**कमळा**–खरेंच चला बाई आंत जाऊं.

[ **कमळा, त्राटिका, सारजा** जातात.

**प्रताप०**–खाशी युक्ति! बायकांशीं लढण्यांत कांहीं हांशील नाहीं. आपण पडलों तर त्यामाग्खी फजिती नाहीं. त्या पडल्या तर त्यांत पुरुषार्थ नाहीं. का यसाजी असेंच कीं नाहीं? पण कायहो अशा वेळ पुढें मुळींच बोलला नाहीं. कसल्या विचारांत गढला होतां? मला यांच्या सांगणी करण्याचा वगैरे सगळा खटाटोप करून शेवटीं आपल्या स्वतःला कांहींच लाभ नाहीं. हा विचार मनांत येऊन तुम्ही खिन्न झालां आहां.

**यसाजी**–तशांतलें मुळींच प्रकार नाहीं. मी मनांत म्हणत होतों कीं. हीं तीन प्रकरणं बरींच अवजड दिसताहेत, त्यांतल्या त्यांत पण आमच्या रंभाजीरावांचेंच नशीब चांगलें दिसतें.

**प्रताप०**–नुसत्या बाहेरच्या देखाव्याला भुलूं नका. खरा प्रकार अगदीं उलटा असण्याचा संभव आहे.

**रंभाजी**:–आपल्या त्राटिकाबाईसाहेबांच्याबद्दल तर तसा संभव मुळींच नाहीं.

**राणोजी**:–अगदीं रास्त. मलाही तसेंच वाटतें.

**प्रताप**:–राणोजी, तुंही त्यांच्यांत शिरोमणि का? बरें आहे! झालें आपलें बोलणें? मी म्हणतों आपल्याला माझ्या आनंदीची परीक्षाच झाली नाहीं. पण हातच्या कांकणाला आरसा कशाला पाहिजे? पैज लावा. आपण तिघेही आपापल्या बायकांना येथें

बोलावूं. ज्याची बायको अगदीं बोलावल्याबरोबर येईल तो पैज जिंकील; ज्याची येणार नाहीं तो हरेल. आहे कबूल ?

**रंभाजी०**-अलबत कबूल आहे. पण पैज कितक्याची ?

**राणोजी०**-बस्स, दहा मोहोरांची.

**प्रताप०**-कोंबडींबकरीं झुंजवायाची असली तर ही पैज चालेल ! आपण नाहीं बोवा आपल्या बायकांची किंमत इतकी हलकी करणार. निदान याच्या वीसपट तरी पाहिजे !

**रंभाजी०**-ठीक आहे ! आमचें काय जातें? आपलाच विचार पहा ह्मणजे झालें.

**राणोजी०**-हो, प्रतापराव, तेंच खरें.

**प्रताप०**-माझ्याविषयीं नका आपण इतकी काळजी करूं ! इतक्यांत मोहोरा आपल्या पदरांत खुळखुळूं लागल्या असें नक्की समजूं.

**राणोजी०**-( आपल्याशीं ) पैजेची [illegible] निघाली हे फार वाईट. आतां आपण येथून हरयुक्तीनें पळ काढावा हें बरें. आमची बया आटिकेवरही तान करील असें शंका नाहीं. ( उघड ) मंडळींनो, आतां रात्र फार झाली आहे. उद्यांवर हा विचार टाकला तर नाहीं का चालणार ?

**येसाजी**-कांहो, तुम्हीं जरा कचरतासे दिसतां ?

**राणोजी०**-तसें कांहीं नाहीं. काल रात्रीं जागरण झालें होतें, त्यामुळें झोंप येते आहे झालें.

**प्रताप०**-राणोजी, राहूं द्या तें. आजचें आणखी जागरण झालें ह्मणून कांहीं आजारी पडत नाहींस आणि त्यांतून वहिनीसाहेबांची स्वारी निघाली पाहिजेना ?

**राणोजी०**-( आपल्याशीं ) तेंही खरेंच.

**येसाजी**-बरें पण अगोदर बोलावणें कोण पाठवतो ?

**रंभाजी०**-मी. तान्या, जा, तिला ह्मणावें अंमळ इकडे येऊन जा.

**तान्या**-जी हुकूम. [ जातो.

**येसाजी**-रंभाजीराव ! मी होतो आपल्या पैजेंत अर्ध्याचा भागीदार.

**रंभाजी०**–छेः छेः! मला कोणी भागीदार नको.

**तान्या येतो.**

कायरे, कोठें आहे ती?

**तान्या**–बाईसाबास्नी मीं निरोप सांगितला. त्या ह्मनत्यात मला काम हाय! मी येत न्हाइ.

**प्रताप०**–छेः छेः असें व्हावयाचें नाहीं. का रंभाजीराव, 'प्रतापराव तुम्हीच आपला विचार बघा!' 'मला कोणी भागीदार नको,'—आठवतात का हे शब्द? कसें काय आतां? किती नम्र उत्तर पण!

**येसाजी**–प्रतापराव! उत्तर कांहीं वाईट नाहीं. असेल काम ह्मणून येत नसतील. आपल्या घरांतून इतकें सरळ उत्तर आलें ह्मणजे मिळविली.

**प्रताप०**–मित्राची तरफदारी आपण चांगली करतां. वहिनीची लूज राखावयाला आपण तयार झालां याचें मला नवल वाटत नाहीं. कारण आपण त्यांचा आणि रंभाजीरावांचा संबंध जुळवून आणण्याकरितां तशीच मेहनत घेतली आहे. बरें, आतां राणोजी, होऊं द्या आपल्या कुटुंबाची परीक्षा.

**राणोजी०**–( आपल्याशीं ) कंबख्ती आली आतां. पण डरून काय उपयोग. ( उघड ) उंः! त्याबद्दल शंकाच नको. निरोप जावयाचा अवकाश कीं आलीच. पिल्या जा, आणि त्यांना ह्मणावें अगत्य यावें. जरूरीचें काम आहे ह्मणावें. [ **पिल्या** जातो.

**प्रताप०**–ठीक आहे. 'त्यांना' आणि 'अगत्य' आतां त्या खात्रीनें येणारच!

**राणोजी०**–प्रतापराव, थट्टा करूं नको. आपलें एवढ्यावरच भागलें ह्मणजे पुरें! नाहीं तर कदाचित् नाकही घासावें लागेल! समजलास.

**पिल्या येतो.**

कायरे! आली का ती?

**पिल्या**-त्या ह्मनत्यात आपुन काय तरी चालनटपना करत अ-साल ! मीं न्हाइ येत ! व्हॉंव तर आपुनच या.

**प्रताप**०-अरे, अरे, अरे ! फारच वाईट ! आपण तर असा निरोप ऐकून जीवच दिला असता ! पिल्या ! जा आणि तुझ्या धनिणीला सांग कीं असशील तशी इकडे ये. [ पिल्या जातो.

**राणोजी**०-हुकूम तर खूप ऐटींत सुटला, पण मी सांगतों काय उत्तर येईल तें ! ती जाज्वल्य त्राटिका आहे ह्मटलें.

**प्रताप**०-काय उत्तर येणार ?

**राणोजी**०-दुसरें काय ? 'साफ येत नाहीं, झक मारतां तुह्मी' म्हणून !

**प्रताप**०-म्हणजे संपलेंच ! नशिबाची पुरी परीक्षा झाली ! पण जरा धीर धरा.

**येसाजी**-आश्चर्य, आहे बोवा. या पहा आल्या.

**त्राटिका** येते.

**त्राटिका**-काय आज्ञा आहे ?

**प्रताप**०-तुझी बहीण आणि सारजा काय करताहेत ?

**त्राटिका**-कांहीं नाहीं. उगीच बोलत बसल्या आहेत.

**प्रताप**०-कसें काय रंभाजीराव, राणोजीराव, यावर आपलें कार्य ह्मणणें ? येसाजी, 'त्यांना काम असेल' नाहीं ! प्रिये अ-शीच जा आणि त्यांना खेंचून घेऊन ये. त्यांना आणल्याशिवाय सोडूं नको. जा लौकर. [ त्राटिका जाते.

**रंभाजी**०-खरोखरच हा मोठा चमत्कार आहे बोवा !

**राणोजी**०-अगदीं विलक्षण गोष्ट. पण हा जो एवढा मोठा बदल झाला याचा शेवट गोड होईलना ?

**प्रताप**०-उंः, असें नाक मुरडूं नका. याचा परिणाम मी सांगतों तुह्मांला काय होईल तो. घरांत नेहमीं शांतता, प्रेम, संसारसुख, नवऱ्याचा वाजवी अंमल आणि खरें साम्राज्य. सारांश, इत-

काल कां सुख आणि समाधान यांचें हें पूर्वचिन्ह आहे समजलां?

यसाजी–प्रतापराव, तुह्मीं पैज जिंकली खरी. अशीच तुमची फत्ते होऊन तुह्मांला नेहमीं सुख मिळो. खरोखरीच या बाईच्या स्वभावांत इतका फरक झाला आहे कीं तो प्रत्यक्ष पाहून देखील मनाची खात्री होत नाहीं. धनाजीरावांनीं हें पाहिलें तर त्यांना किती तरी आनंद होईल!

प्रताप०–थांबा. अजून तुह्मांला तिच्या स्वभावांत किती अंतर पडलें आहे याचें स्वरूप कळलेंच नाहीं. ती आतां इतकी सद्गुणी आणि पतिसेवादक्ष झाली आहे कीं, अशी दुसरी स्त्री शोधूं पाहतां देखील मिळावयाची नाहीं. पहा ती कशी येते आहे इकडे, आपल्या हट्टी स्त्रियांचा कुर्रा जिंकून स्वतःच्या पातिव्रत्याचा आणि सद्गुणांचा झेंडा मिरवीत. जित शत्रूंनीं परिवृत, जयश्रीनें वरलेल्या, एखाद्या वीराप्रमाणें ती आतां दिसते आहे. तरीही पण तिनें विनयाला कांहीं झुगारून दिलेलें नाहीं.

कमळा व सारजा यांसह त्राटिका येते.

आनंदी, आज माझी तूं केवढी कामगिरी बजावून मला धन्य केलें आहेस! पण आतांच यांचें माझें बोलणें चाललें होतें. मीं तुझी स्तुति केलेली ऐकून त्यावर यांनीं ह्मटलें कीं, 'तें सारें खरें, पण तुमची बायको इतर बायकांप्रमाणें व दागिन्यांची हावरी आहेच.' तेव्हां यांची खात्री कर कीं स्त्रियांचा खरा दागिना पातिव्रत्य. त्यालाच तूं काय तें मोल देतेस, इतर दागिने असले काय आणि नसले काय.

त्राटिका–मग मला अगोदरच कां नाहीं असें सांगणें झालें? दागिन्यांशिवाय मी असलें तर आपल्याला व ह्याबांना वाईट वाटेल ह्मणूनच मीं हे अंगावर घातले होते. खरें ह्मटलें ह्मणजे बायकांचा खरा दागिना पातिव्रत्य हाच. तो मीं कधीं काढणार नाहीं कोणीही सांगितलें तरी. या मेल्या खोट्या दागिन्यांना घेऊन मली काय करावयाचें आहे? (दागिने काढूं लागते.)

**रंभाजी०**-वहिनी, राहूं द्यात तसेच. काढावयालाच नकोत कांहीं प्रत्यक्ष.

**कमळा**-अगबाई ! यालाच का पतिव्रताधर्म म्हणावयाचें ? इश्श ! जळेना का तो धर्म मेला ! आपण नाहीं बाई अगदीं असें पाटाखालचें मांजर होऊन बसणार !

**रंभाजी०**-वा: ! आपण मोठ्याच शहाण्या किनई ? आपल्याला कशाला हा पतिव्रताधर्म आवडेल ? आपल्या या शहाणपणामुळेंच आज आमच्या खिशाला चांगलाच खार लागला ! आणि वरतीं चारचौघांत फजिती झाली ती निराळीच. खरेंच, बायकांची परीक्षा करणें फार कठिण. त्यांच्या स्वभावाबद्दल कांहीं खात्री मानूं नये !

**कमळा**-पुरे, पुरे आतां. इतक्यांतच नको कांहीं इतका अंमल गाजवावयाला. माझ्याबद्दल पैज मारावयाला आपल्याला कोणीं सांगितलें होतें ? मी का आलें होतें सांगावयाला ? दुसरें कोणीं असतें तर अक्कल कोठें गेली म्हणून विचारलें असतें

**अटिका**-माई, काय हें ?

**रंभाजी०**-बरें आहे ! आह्मीं झक मारिली; गाढवपणा केला बरें ! आतां बंद करा आपलें तोंड.

**कमळा**-अंगावर शेकलें म्हणजे मग त्याचें उसनें काढावयाचें आपल्या बायकोवर ! बिचारी गाय सांपडली असते हातांत; पाहिजे तशी झोडपावी !

**सारजा**-खरेंच का यांनीं पैजा मारल्या होत्या आमच्याबद्दल? इश्श ग बाई ! कोण तरी मेला हा चटोरपणा ! ऐकलें का ? आपली स्वारी होतीना यांत ? बरें आहे, पाहून घेईन.

**प्रताप०**-राणोजी संभाळरे आतां. मला वाटतें तुला आज घरीं जावयाची कांहीं सोय नाहीं.

**सारजा**-पाहूं या कसें घरीं येणें होत नाहीं तें !

**राणोजी०**-अग तूं त्यांचें काय ऐकतेस. मी तुझ्यामागें येणारच

**प्रताप०**-बस्स; वहिनी. आनंदी ! या चढेल हट्टी बायकांना

तर पतिव्रताधर्म कसा असतो तें नीट समजून सांग पाहूं ! फारच ेफाटल्या आहेत त्या.

**सारजा**-ऐकलेंत का भाऊजी ! पुरे आतां ही थट्टा ! आपली बायको आपल्याला मोठी शहाणी वाटत असेल. ती एक अगदीं गरीब झाली असेल; व पायाखालीं तुडवून घ्यावयाला तयार असेल. पण आह्मी नाहीं हो असें सोसणार ! ती आह्मांला शहाणपणा शिकवणार काय ? अहाहा ! दिवेच ओवाळा !

**प्रताप०**-अबबब ! केवढा तोरा ! आनंदी तर मग हिचेच कान आधीं उपट. चांगलें चरचरीत अंजन घाल डोळ्यांत !

**सारजा**-तिची काय बिशाद आहे ?

**प्रताप०**-परीक्षा पहावयाची आहे का ? आनंदी हं ! कर सुरू.

**त्राटिका**-छेः छेः ! माई, सारजाबाई, हें काय तुम्हीं मांडलें आहे ? मोडा त्या कपाळाच्या आंठ्या ! नका असे डोळे वटारूं ! यांच्यावर राग करावा पण तो कोणता ? हा नव्हे.-अहो, हे आपले पति, आपले धनी, आपले राजे ना ! खरेंच सांगतें द्या टाकून हा राग-हा तुमच्या साऱ्या स्वरूपाला आणि सद्गुणाला हरताळ लावतो; हा केवळ कलंक आहे. नदीचें पाणी गढूळ झालें म्हणजे तिच्याकडे कोणीही ढुंकून तरी पहातो का ? कितीही तहान लागली असली तरी तिचें पाणी कोणी तोंडांत घालतो का ? पति ह्मणजे आपलें दैवत, आपलें सर्वस्व. पति आणि पत्नी ह्मणजे शीर आणि अवयव. अवयवाचें कधीं शिरावांचून चाललें आहे ? मी ह्मणतें इकडे नीट लक्ष द्या. आपल्या पतीची सर्व काळजी निरंतर आपल्या संरक्षणाबद्दल असते ती कां ? नेहमीं काबाडकष्ट करावयाचे, शरीराचे हालहाल करून घ्यावयाचे, विकट प्रसंगीं रात्रीच्या रात्री जागून काढावयाच्या, थंडीवाऱ्याला जुमानावयाचें नाहीं, नानाप्रकारचे दुःसह अपमान सोसावयाचे,-हें सारें कशाकरितां ? तर घरीं तुह्मांला सुख, समाधान व आनंद व्हावा म्हणून ना ? आणि या साऱ्या श्रमाचा मोबदला तरी किती थोडा ? त्यांच्याशीं नेहेमीं हंसून गोड बोलावें, प्रेमानें वागावें, आणि ते सांगतील तें ऐकावें !

इतकें अल्प त्यांच्या येवढ्या श्रमाबद्दल आम्हीं त्यांना द्यावें हें आमचें कर्तव्य नव्हे काय? तर मग उद्धटपणा, मनाचा कुचकेपणा, राग, तुसडेपणा, या अवगुणांनीं आपल्या कर्तव्याला आपण मुकतों असें नाहीं का होत? पतिद्रोहासारखी कृतघ्नता आणि त्यासारखें पातक दुसरें कोणतेंच नाहीं. हें पातक कोठेंही रुजू व्हावयाचें नाहीं. आणखी असें पहा, आमचीं शरीरें मृदु, कोमल, आणि अशक्त,-जड व श्रमाचीं कामें करण्यास निरुपयोगीं-अशीं जीं बनविलीं आहेत त्यांत देवाचा काय बरें हेतु असावा? आमच्या शरीराप्रमाणें आमचीं मनेंही मृदु, कोमल आणि नाजूक असावीं असा नाहीं का त्याचा हेतु दिसत? आपण स्वतंत्र झालों तर आपलें चाललें आहे असेंच चालेल का? आपला ताठा काय उपयोगीं? भांडावयाची सामुग्री तरी आमच्यापाशीं कशी आहे ती पहा. आमचीं हत्यारें कोणतीं? अश्रू, रागाचे शब्द आणि फारच झालें तर अन्नपाणी टाकून स्वतःचे हाल करून घेणें-हींचना आमचीं शस्त्रें? यांनींचना आम्हीं जय मिळविणार? पण तुम्हीं म्हणाल कीं, या साधनांनींच बायका नवऱ्यांना आपलें ऐकावयाला लावतात; पण ही चूक आहे. आमचें जबरदस्त शस्त्र म्हणजे त्यांचें आपल्यावरचें प्रेम. त्याच्याच योगानें ते आमचे राजे असूनही आमचे बंदे गुलाम बनतात. आणि हें असलें शस्त्र तुम्हीं आपल्या हातचें घालविणें म्हणजे आपलाच गळा कापण्यासारखें. मला देखील तुमच्याप्रमाणेंच वाटत होतें. आतांचें हें तुमचें करणें माझ्या पूर्वींच्या वागण्यापुढें कांहींच नाहीं. पण देवानें-देवानें कसचें -इकडूनच माझे डोळे लवकर उघडावयाचे झाले. आणि मी तुमच्या गळ्याशपथ सांगतें कीं, तेव्हांपासून लग्नापासून खरें सुख काय असतें तें मला चांगलें कळूं लागलें आहे. तिकडून कांहीं जरी म्हणणें झालें तरी माझ्या सांगण्याप्रमाणेंच वागणें होतें. आणि तें कां? मी तिकडच्या मर्जीचा कल संभाळतें म्हणून. अशक्तपणा कबूल करण्यापासून वास्तविक आपलाच जोर अधिक वाढतो. मग आतां वाट कशाची पाहतां? धरा त्यांचे पाय. तुम्ही त्यांच्या अर्धांगीना! मग शरीराचा एक भाग दुसऱ्या भागा-

च्या पायां पडला असें होईल. यांत अपमान कोणाचा ? हूं, ला आतां. ( दोघींना आपापल्या नवऱ्यांच्या जवळ नेऊन पढाव्याला लावते. )

सर्व-शाबास, शाबास. तूं खरी पतिव्रता आहेस.

प्रसिद्ध इंग्रज तत्त्ववेत्ते "जॉन स्टुअर्ट मिल." यांच्या
"लिबर्टी" नामक ग्रंथाचें भाषांतर.

# स्वातंत्र्य.

(ग्रंथकाराचें चरित्र, ग्रंथांतील सार, विषयविवेचनांतील
मुख्य मुद्यांची अनुक्रमणिका आणि स्पष्टीकरणार्थ
विविध माहितीच्या टीपा यांसह)

## नारायण लक्ष्मण फडके, बी. ए.,

यांनीं केलेलें.

[illegible]चा काळ चळवळीचा आहे. सुधारणेविषयींची इच्छा [illegible]च्या अंतःकरणांत विशेष जारानें आपला अंमल बसवूं ला[illegible] आहे. जुन्यांना वाटतें कीं, जुनीं बंधनें, जुन्या चालीरीती नष्ट [illegible]ालल्या आहेत त्यांचें पुनरुज्जीवन करून नवीन विचार व [illegible]र यांच्या दिशेनें धांवत जाणाऱ्या लोकमताच्या प्रवाहास [illegible] बहिष्कारादि सामुग्रीचा उपयोग करून) घालून आडवावें. [illegible]स वाटतें कीं, जुने आचार व विचार गचाळ व घातकी आ[illegible] यांचा विमोड केला पाहिजे व बहुजनसमाजाचें त्या आचार[illegible]ंस पाठबळ असल्यामुळें ते मोडण्यास कठीण, तेव्हां त्यां[illegible] चालवावयाचें शस्त्र तेंही प्रखर पाहिजे असें जाणून ते सर[illegible] साहाय्य घेऊं पाहात आहेत. अशा स्थितींत व्यक्तिस्वातं[illegible] मधल्यामध्यें कसा चुराडा उडतो; समाजहितास व्यक्ति[illegible]याची किती जरूर आहे; राजकीय बाबतींत राजा आणि [illegible] यांचे अधिकार कसे असावेत इत्यादि महत्त्वाच्या प्रश्नांस [illegible] महत्त्व आलें आहे. तेव्हां स्वातंत्र्य या विषयावर सुप्रसिद्ध तत्त्ववेत्ते जॉन स्टुअर्ट मिल्ल यांनीं लिहिलेल्या पुस्तकाचें मह[illegible] भाषांतर यावेळीं प्रसिद्ध केलें असतां फार उपयोग होईल, [illegible]जाणून आम्हीं तें छापून तयार केलें आहे.

ग्रंथांत एका महातत्त्वाचें विवेचन व उद्घाटन असल्यामुळें [illegible] यांत तत्त्वमूलक विचार ठिकठिकाणीं भरले असल्यामुळें [illegible]ंथ नुसता समजण्यास अवघड आहे. तथापि भाषांतरका[illegible] तो सुबोध करण्यासाठीं अतिश्रमानें स्पष्टीकरणार्थ विविध [illegible]च्या टीपा जोडल्या आहेत. त्यांत न समजणाऱ्या अगर [illegible]न्वित अशा प्रत्येक स्थलावर खुलासा केला आहे.
[illegible] १।। रु०, पो० २ आणे.

म्यानेजर, आर्यभूषण छापखाना, पुणें.

